Gangadhara krisnalā Shastri
Paramrahasya (chapter 1-17)
परमरहस्य
Marathi
Paper – Printed
1809 Sakabda (132 years old)
101 Folio
10" X 6.8"
Complete

ग्रन्थोऽयं
सातारकरोपाह्व श्री गंगाधर कृष्णभट्ट शास्त्रिणा

## ॥ अथश्री परमरहस्य प्रथमोऽध्यायः ॥

पं. चि. द. वीरभद्र शास्त्रिणे प्रदत्तः
(२३-४-३५) ई. स.

॥ श्री मन्महागणाधिपायनमः श्री सरस्वत्यैनमः श्रीगुरुभ्योनमः श्री
गुरुलिंगायनमः ओंनमः शिवायनमः चन्नबसवायनमः संगणबसवायनमः
सिद्धबसवायनमः कुडलसंगमनाथायनमः गुहेश्वरायनमः ॥ श्री सद्गुरु
कृपेंकरून ॥ आदि नमूं शिवगण ॥ जेका अमर सर्वांहून ॥ तयांस प्रेमें
शरण मी ॥१॥ रुद्रगणा तयेपरी ॥ शरण रिघोयेअवसरीं ॥ शिवगणाची
असे थोरी ॥ ग्रंथांतरीं न वर्णवे ॥२॥ असंख्यांत शिवगण आदि अ-
नादि बसवा जाण ॥ नित्य बसवा राजमान ॥ भक्ता पावन करितसे ॥३॥
येळनुरु यप्पतु गण ॥ अवतीर्ण पुरातन ॥ नुरंदय्या शरण ॥ वरप्रदान
व्हावया ॥४॥ सदाशिव परशिव ॥ महागुरु प्रभुराव ॥ आचाराग्रगण स-
एव ॥ सदा वैभव शिवाचें ॥५॥ तीर्थ प्रसाद नेमेशीं ॥ जो सादर
आहर्निशीं ॥ आलस्य त्यजीं प्रेमेशीं ॥ भक्तिभावेशीं त्या शरण ॥६॥
ऐसे नमुनी शिवगण ॥ पंचाच्यार्य मुख्य जाण ॥ जे वीरशैव कुलो-
त्पन्न ॥ गणसृष्टिकर्ते जे ॥७॥ परि यांचे आवतार ॥ चतुर्युगांत साचार
॥ कोणकोण ते नामाधार ॥ ईश्वर मुखीं उद्भवले ॥८॥ तया आचार्या
करूं शरण ॥ रेवणसिद्ध मरुळसिद्ध जाण ॥ तिसरा एकोराम ज्ञानी-

या पूर्ण ॥ चौथा तो पंडिताराध्य ॥९॥ हे चहूंयुगीं आचार्यचारी ॥ मुख्य
शिवाचारास पुढारी ॥ पांचवा असे सहाकारी ॥ विश्वआर्याप्रति वंदिलें
॥१०॥ युगपरत्वें आचार्य पांच ॥ धर्म रक्षणार्थ अवतार साच ॥ हे तो
शिव आज्ञें करूनिच ॥ प्रगट होत मृत्युलोकीं ॥११॥ तो श्री गुरुकैव-
ल्यदानी ॥ अगम्य अगोचर अद्वैत निर्वाणी ॥ अविनाश अनिर्वचनी
अनुपंम्य स्वामीया ॥१२॥ अनाम तूं अपरांपरा ॥ श्री गुरुमूर्ति नागे-
श्वरा ॥ नागेश हें आडनांव जी दातारा ॥ यरवीं अनाम तूं ॥१३॥
तूज रेखा ना नाम ॥ आह्मीं भक्तें धरून प्रेम ॥ ठेविलें सगुण नाम ॥
अगम्य तूं वेदशास्त्रा ॥१४॥ परि भक्तिलागीं आकारलासी ॥ गुरुरूपें
भक्ता तारिसी ॥ मज अज्ञापि परमरहस्यासी ॥ टीका करावया ॥१५॥
स्फूर्ति उन्मेष देऊन ॥ स्वयें वाचेची वाचा होऊन ॥ प्रेम रसातें ओघ-
ळून ॥ अक्षर वदवी स्वामी ॥१६॥ मी नेणें विवेक प्रबंधू ॥ बोलूं नेणें
संगीत शब्दु ॥ तरी तूं कृपादृष्टि प्रबोधु ॥ परमरहस्य सार्थ करवीं ॥
॥१७॥ ऐसें विनवूनी भूमीं ठेविला माथा ॥ तव कृपा आली श्री गुरु-
नाथा ॥ अशीरिणी वदे तत्वता ॥ वर असें तुज पै ॥१८॥ श्री गुरु-

वाक्य ऐकून कर्णीं ॥ करकमलें जोडून दोन्हीं ॥ ह्मणे सद्गदित अं-
तःकर्णीं ॥ वरदानें ग्रंथ पूर्ण करी ॥१९॥ आतां वक्ता येथें विश्वनाथ ॥
ह्मणून श्रोते गण प्रमथ ॥ यातें स्तवूं जोडून हात ॥ सावध व्हावें
निरोपणीं ॥२०॥ शिवगणा सावध होई ऐसे ॥ बोलणें केवळ अज्ञान
भासे ॥ तें सार्वकाल सावध असे ॥ बोलिलों तें अन्यायें ॥२१॥ शिव-
गण काय असावधान ॥ म्या तयांस ह्मटलें व्हा सावधान ॥ पण ते
सदा सावध ह्मणून ॥ जगत्रय वेततसें ॥२२॥ तरी अन्याय क्षमा कीजे
॥ पितयापरीत्वें साहिजे ॥ मज कृपादृष्टि पाहिजे ॥ शिवगणा
तुमची ॥२३॥ तुह्मी शिवगण प्रमथ ॥ दयाळ सत्य कृपावंत ॥ मी तु-
मचा असें अनाथ॥ तै सलगीनें बोलिलों ॥२४॥ तुमचें अवधानेंन ईश
तुष्ट ॥ तुह्मां अवधान द्या ह्मणणें खोटें ॥ हें असें बोल कां निघती ओठें
॥ याचा अभिमान तुह्मां ॥२५॥ मज पामराशीं साह्यता ॥ तुमचे तुह्मीं
बोलवा ग्रंथा ॥ टीका करवाल आपुल्या स्वार्था ॥ मज कुंथाकुंथी का-
यसी ॥२६॥ ग्रंथीं संवाद शिव गौरीचा ॥ निज ठेवा तो शिवगणाचा
॥ या लागीं बोलवाल वाचा ॥ आमुच्या सुखालागीं ॥२७॥ तुह्मी सु-

स्वरूप सदा आनंदें ॥ तरी जीव तरती तुमच्या प्रसादें ॥ यास्तव टीका करवाल स्वानंदें ॥ मज रंकाकडून पै ॥२८॥ तव श्रोते शिवगण बोलती ॥ आतां परिहार देसी किती ॥ शिवें काय बोधिलें पार्वतिप्रती ॥ तें निरोपावें आतां ॥२९॥ बरवें स्वामी ह्मणूनी ॥ मस्तक ठेविला चरणीं ॥ पार्वतीस बोधी शूलपाणी ॥ तेची रहस्य सांगेन ॥३०॥ आतां नमूं तै चिच्छक्ति ॥ जी जगन्माता पार्वती ॥ अज्ञानजना उत्तम गती ॥ जयेच्या अनुग्रहें ॥३१॥ जये परशिवा परब्रह्मा ॥ वेदा नेणवे तुझा महिमा ॥ साकार होऊनिया आम्हां ॥ इच्छित हेतु पूर्ण करसी ॥३२॥ पूर्वीं पार्वतीनें प्रश्न केला ॥ आधीं गुरु महिमा वर्णीला ॥ पुढें परमरहस्य निवेदिला ॥ आनंदली गौरी जेणें ॥३३॥ त्याच क्रमें हा परम ग्रंथ ॥ आरंभीं किंकर मन्मथ ॥ श्रवणीं श्रोतें वीरशैव समस्त ग्रीवा आनंदें डोलविती ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ कैलास शिखरे रम्ये भक्ति संधान नायकं ॥
प्रणम्य शीरसा देवी शंकरंपरि पृछति ॥ १ ॥

टीका ॥ कैलास शिखरीं रम्यस्थलीं ॥ भक्ति संधानें हिमनगबा-

ळीं ॥ प्रणम्ये करून तय वेळीं ॥ पुसूं लागें शंकरासीं ॥३५॥
॥ श्लोक ॥ भगवन् सर्व धर्मज्ञ ज्ञान विज्ञान नायक ॥
॥ ब्रूहिमे कृपयादेव गुरुमहात्म्य मुत्तमं ॥२॥
टीका ॥ सर्व धर्मास कोण असे धनी ॥ ज्ञान विज्ञान वर्ते जया पासूनी ॥ तो मज निरोपा कैवल्यदानी ॥ कैसा महिमा पै गुरुचा ॥३६॥
॥ श्लोक ॥ ईश्वरूवाच ॥ योगुरुःस शिवप्रोक्ता योशिवः सगुरुःस्मृता ॥
भुक्ति मुक्ति प्रदातारं तस्मै श्री गुरुवेनमः ॥३॥
टीका ॥ जो परमात्मा परमेश्वरु ॥ तोची सदाशिव सर्वां गुरु ॥ भुक्ति मुक्ति देतां उदारू ॥ सदय निजभक्तासी ॥ ३७॥ तोची ज्ञान विज्ञानदायक ॥ तोची कर्म धर्मासी साह्यक ॥ तोची व्रत तीर्थासी नायक ॥ सद्गुरु तोची जाणिजे ॥३८॥ आतां भुक्ति मुक्ति कोण कैसी ॥ ज्ञान विज्ञान ह्मणावें कोणासी ॥ धर्म आणि कर्म निर्णयासी ॥ निरोपा ह्मणें पार्वती ॥३९॥ शंकर ह्मणें हो गिरजे ॥ तव प्रश्न निर्णय ऐक वोजे ॥ ऐकून हृदयीं धरिजे ॥ फल पावें विश्वासें ॥४०॥ येथें भुक्तिजी बोलिंजे ॥ धन संसार सुख जें जें ॥ तीचसद्युन् भुक्ति जाणिजे ॥ ती देता मी

३ ईश्वरु ॥४१॥ मुक्ति द्विविधा असती ॥ ऐक त्या सगुणा चारी मुक्ति ॥
काळाची कांबी होय गाजती ॥ चहूंचिया माथां ॥४२॥ निर्गुण सायुज
पांचवी जाणीजे ॥ तेणें स्वयें परब्रह्मच होईजे ॥ देह असतां जातां अखंड
असीजे ॥ मग वस्तुची आपण ॥४३॥ जैसा तरंग क्षीरसागरीचा ॥
भंगता न भंगें सागरची साचा ॥ तेवीं देह भंगता न भंगें ब्रह्मिचा ॥
ब्रह्म पुतळा साच तो ॥४४॥ स्वयें स्वरूप होणें आपण ॥ नाहीं क्रिया
कर्म बंधन ॥ सोहं सिद्धि सदा सावधान ॥ तेंची मुक्तिपद पार्वती ॥४५॥
पिंड ब्रह्मांडा जाणूनि झाडा ॥ सच्चिदानंदाचा निवाडा ॥ करूनि
जाणीजे निजतत्व पुढा ॥ त्या नांव विज्ञान ॥४६॥ जाणून तैसेची होईजे ॥
झालेपणाचा आठव आठिजे ॥ जाणीव अज्ञान निमे सहजे ॥ तेंची जाण
विज्ञान ॥४७॥ धर्म तो कुळीचा जाणीजे ॥ कुलधर्मीं निष्टत्व
वर्तिजे ॥ अधर्माची शीग निमे सहजे ॥ तोची धर्महो देवी ॥४८॥ कर्म
तें क्रियाकर्म जाणीजे ॥ धर्म क्रिया निपून अचरीजे ॥ निष्काम
फलाशा बुद्धि कीजे ॥ तेंची शुद्ध कर्म होय ॥४९॥ जो भुक्ति ज्ञान
विज्ञान दाता ॥ धर्म कर्म सर्व क्रिया भोक्ता ॥ तो श्री सदाशिव कर्ता हर्ता ३

॥ तया सद्गुरुसी नमूं ॥५०॥

॥ श्लोक ॥ चैतन्यं शाश्वतं शांतं व्योमातीत निरंजनं ॥

नाद बिंदु कलातीतं तस्मै श्री गुरुवेनमः ॥४॥

टीका ॥ पिंड ब्रह्मांड सृष्टि सर्वांगीं ॥ व्यापक चैतन्य अंगसंगीं ॥ जडातें चेतवी चैतन्या पांगीं ॥ ऐसा सद्गुरु जाणीजे ॥५१॥ शाश्वत म्हाणिजे यथास्थित ॥ अक्षयीं अजरामर सदोदीत ॥ वसे म्हणूनि नाम शाश्वत ॥ श्री गुरु पदतें ॥५२॥ शांत म्हणजे कर्तृत्व नाहीं ॥ षडुर्मिविकार नुठें कांहीं ॥ मन बुद्धि निमे तोची पाही ॥ सदा सद्गुरु स्वरूप ॥५३॥ व्योमातीत म्हणजे आकाश रहित ॥ निरंजन जे जन व्यापून आतीत ॥ नांद बिंदु कालाज्योती रहित ॥ ऐसिया सद्गुरुसी नमावे ॥५४॥

॥श्लोक॥ स्थावरं जंगमा धारं निर्मलं स्थिरमेवच ॥

जगद्वंदेतां पादाय तस्मै श्री गुरुवेनमः ॥५॥

टीका ॥ पृथ्वी पर्वत वृक्ष स्थावर बोलिजे ॥ चलन वलन जंगम म्हणीजे ॥ आणिया समग्रास आधार जे जे ॥ तें जाणीजे गुरु-

४ रूप ॥५५॥ जे निर्मल त्रिगुण मळासी ॥ जे गंभीर व्यापक सर्वां-
सी ॥ त्रैलोक्य वंदिती त्या पदांशी ॥ त्या सद्गुरुसी नमावें ॥५६॥

॥श्लोक॥ स्थावरं निर्मलंशांतं जंगम स्थिरमेवच ॥
व्याप्तं येनजगत्सर्वं तस्मै श्री गुरवेनमः ॥६॥

टीका ॥ स्थावर निर्मल आणि शांत ॥ जंगम स्थिर ब्रह्म निश्चित ॥
या सर्व जगासी जो व्याप्त ॥ तया श्री गुरुसी नमावें ॥५७॥

॥ श्लोक ॥ ज्ञान शक्ति समारूढ स्तत्वमाला विभूषितः ॥
अज्ञानांधस्तमसूर्यः तस्मै श्री गुरुवेनमः ॥७॥ ×

टीका ॥ जो ज्ञानशक्ति आरूढ होऊन ॥ लेऊन तत्वमाला भूषण ॥
जो अज्ञानांधःकार छेदी भान ॥ तया श्री गुरूसी नमावें ॥५८॥

॥ श्लोक ॥ आखंड मंडलाकरं व्याप्तेनच चराचरं ॥
तत्पदं दर्शितंयेन तस्मै श्री गुरुवेनमः ॥८॥ ×

टीका ॥ जी वस्तु अखंड मंडलाकार ॥ तत्व व्यापून असे चराचर ॥
तें पद दाखवी निरंतर ॥ तया गुरुसी गमन असे ॥५९॥

॥ श्लोक ॥ ब्रम्हा विष्णुश्च रुद्रश्च शांकरश्च सदाशिवः ॥ ४

एते गर्भे गतायश्च तस्मै श्री गुरुवेनमः ॥९॥

टीका ॥ ब्रह्मदेव विष्णु यम आवतार ॥ हे सदाशिवाचे मुख्य मुक्त्यार ॥ सृष्टि कर्मादि गण साचार ॥ शिवापासून उद्भवले ॥ ६० ॥ हे सर्व गुरुचे शेवक ॥ ह्मणून सर्वा ज्ञानदायक ॥ तेही गुरुकृपेंस्तव देख ॥ गर्भा येती श्री गुरुच्या ॥६१॥ ऐसा श्री गुरु समर्थ ॥ ज्याचे गर्भी विश्वनाथ ॥ सदा राहे आनंदीत ॥ तया गुरुसी नमावें ॥६२॥

॥ श्लोक ॥ गुरुर्देवो महादेवो गुरुर्देवः सदाशिवः ॥

गुरुतत्व परंनास्ति तस्मै श्री गुरुवेनमः ॥१०॥

टीका ॥ गुरु तोची महादेव ॥ गुरु तोची सदाशिव ॥ गुरु परता नाहीं देव ॥ ह्मणूनिया गुरुसी भजावें ॥६२॥ ब्रह्मा विष्णु महेश ॥ हे श्री गुरुचे अंश ॥ तेही ध्याती श्री गुरुस ॥ यालागीं गुरुसी नमावें ॥६३॥

॥ श्लोक ॥ अज्ञान तिमिरांधस्य ज्ञानांजन शलाकया ॥

चक्षुरुन्मिलितं येन तस्मै श्री गुरुवेनमः ॥११॥

टीका ॥ अज्ञानरूप अंधःकार ॥ ज्ञानांजन लेववून केला दूर ॥ प्रकाशमान झालें अंतर ॥ तया श्री गुरुसी नमावें ॥६३॥

॥ श्लोक ॥ भवारण्य प्रतिष्टस्य दिग्मह्रा भ्रांत चेतसः ॥
एवमेदर्शितः पंथा तस्मै श्री गुरुवेनमः ॥१२

टिका ॥ भव संसार ह्या अरण्य वनीं ॥ अहं भ्रांती भ्रमें दिशा भुलोनीं ॥ काम क्रोध व्याघ्र सिंहें वेढूनी ॥ ग्रासूं आरंभिलें तेथें ॥६४॥ तव अदृष्टें भेटला कृपादानी ॥ त्यानें दुष्ट स्वापदें टाकिली छेदुनी ॥ सुपंथें लाविलें शुद्ध बोधूनी ॥ तया श्री गुरुसी नमावें ॥६५॥

॥ श्लोक ॥ अनंत जन्म संप्राप्ते कर्मा कर्म विदाहिने ॥
ज्ञानानल प्रदग्धानि तस्मै श्री गुरुवेनमः ॥१३॥

टीका ॥ अनंत जन्म प्राप्त कां ह्मणसी ॥ कर्म धर्महीन वर्तनें नर्कासी ॥ भोगणें असें अनयासी ॥ तेणें होती जन्म फेरे ॥६६॥ यालागीं श्री सद्गुरुसी ॥ शरण जावें अहार्निशीं ॥ अधर्में केलें कर्मासी ॥ ज्ञानानळें दग्ध करी ॥ ६७॥ येथें संपवून गुरुमहात्मा ॥ पुढें रहस्या वदवीं परमात्मा ॥ तया श्रोतया प्रत्यगात्मा ॥ होवोनिया तुष्टवीं ॥६८॥ जो असेल साच वीर ॥ त्या हा ग्रंथ भवपार ॥ देवोनिया मुक्ति थोर ॥ निर्वाण ती सायुज्ज ॥६९॥ इति श्री परमरहस्य सारामृत ॥ उमा म-

हेश्वर संवादीं वर्तत ॥ त्याची टीका करूनि प्राकृत ॥ कृतकृत मन्मथ ॥७०॥ इति श्री परमरहस्य प्रथमोध्यायः ॥ समाप्तः॥ ॥ छ ॥



॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

 

श्रीगुरु ब्रह्म स्वरूपायनमः ॥ श्लोक ॥ नमामि श्रीगुरुं शांत प्रत्यक्ष
शिव रूपकं ॥ शिरसा योग पीठस्थं मुक्तिकार्यार्थ सिद्धये ॥१॥
टीका ॥ प्रथमोध्यायीं गुरुस्तव ॥ करूनि श्रोत्या अनुभव ॥ द्वितीय
अध्यायीं अभिनव ॥ गुरु रूप वर्णिलें ॥१॥ जोसाक्षात शिवस्वरूप ॥
जो तेजें प्रचंड प्रताप ॥जो वीरशैव धर्माधिप॥मोक्षदायक जगतांचा ॥२॥
॥ श्लोक ॥ पार्वत्युवाच ॥ केण मार्गेण भोस्वामिन् ॥ देह ब्रह्म मयो-
भवेत् ॥ त्वत्कृपा कुरु मे देव ॥ चरणौ शरणं तव ॥२॥
टीका ॥ पार्वती ह्मणें जगदेश्वरा जेप्राणी देहधारी अवधारा ॥ ब्रह्म
केवीं होती चराचरा ॥ तेंगुह्य सांगामज ॥३॥
श्रीशिवौवाच ॥ ॥ श्लोक ॥ यस्यदेवे पराभक्ति र्यथादेवो तथा गुरौ ॥
तस्यै ते कथिता ह्यर्थः प्रकाशंते महात्मना ॥ ३॥ प्रातःशिरसी शुक्का-
ब्जं द्विनेत्रं द्विभूजं गुरुं ॥ वराभयकरं शांतं स्मरे तन्नाम पूर्वकं ॥४॥
प्रसन्न वदनाक्षंच सर्वदेवस्वरूपिणं तत्पादोदकस्य धारा ॥ निपतंति
स्वमूर्धने ॥५॥ तीर्थानि दक्षिणेपादे वेदास्तवमुख माश्रिताः ॥ पूजिये-
दर्चित तनु तेदभिध्यान पूर्वकं ॥६॥

टीका ॥ ईश्वर ह्मणें हे पार्वती ॥ गुरु तोची देव जाणती ॥ सद्भावें जे सदां अर्चेती ॥ ते ब्रह्मची जाणीजे ॥४॥ आणि सांगतों तुज ऐक ॥ जो द्विभूज द्विनेत्र देख ॥ वरद्यावया अवस्यक ॥ एकमूख शोभतसे ॥५॥ जर वदनें अनेक असती ॥ तरी वर नपवें निश्चिती ॥ म्हणूंनिया आत्मास्थिती ॥ जगामाजीं प्रवर्तली ॥६॥ गुरुचें पादोदकेंकरून ॥ नित्य देह्याचें होय क्षाळण ॥ तरीं जन्मांतरीचीं पापें जळून ॥ दिव्य शरीर होय पै ॥७॥ गुरु मूर्ति शांत सगुण ॥ अद्वितीय प्रसन्न वदन ॥ देवामाजीं श्रेष्टजाण ॥ पूर्ण ब्रह्मह्मणोनि ॥८॥ तयाचें दक्षिण चरणीं ॥ वसती सर्व तीर्थें जाउनी ॥ वेद मुखाचा आश्रय करूनि ॥ राहे आनंदें तेथेंची ॥९॥

॥ श्लोक ॥ काशीक्षेत्र निवासासौ जान्हवी चरणोदकं ॥ गुरु र्विश्वे-
श्वरः साक्षात्तारकं ब्रह्मनिश्चितं ॥७॥

टीका ॥ भूकैलास वाराणसी ॥ पुरी विराजीत काशी ॥ सप्त पुरी-यांत अविनाशी ॥ महा तीर्थ वंद्यजे ॥१०॥ तेथें असे विश्वेश्वर ॥ तैसाच मानिला गरुसाचार ॥ उभय चरणें स्पर्शी नीर ॥ तेच तीर्थ

मानिलेंसे ॥११॥ ज्या ज्या तीर्थीं आहे पाणी ॥ तीं तीं शिवाची पाय-
धुणी ॥ परी तेची उत्तम ह्मणूनि ॥ अभिषकेतीदेवातें ॥१२॥ तैसेची
गुरुचरणीचें उदक ॥ परम पवित्र पावन देख ॥ त्याचा करितां अभि-
षक ॥ संतोषींत गौरी मी ॥१३॥ आतां सांगणें निश्चित एक ॥ ब्रह्म
जाणील्या तीर्थतारक ॥ तैसे नोव्हे गुरुपादोदक ॥ साक्षात्ब्रह्म दायक
असे ॥१४॥

॥ श्लोक ॥ शिवं शिवा प्रपृच्छति गुरोतीर्थ म्महात्मनः ॥ मर्त्यांकिं
फल मान्पोति मांप्रति सत्वरंवद ॥८॥

टीका ॥ पार्वती ह्मणे महेशा ॥ गुरुतीर्थ महिमाकैसा ॥ कवण फल
मनिशा ॥ नंदीशा सांगा मज ॥१५॥

श्रीशिवोवाच ॥ श्लोक ॥ वेदमंत्र क्रियामंत्र ॥ सर्व मंत्र ममोद्भवं ॥
मद्रूपं जंगमं देवी ॥ सर्व क्रिया प्रतिष्ठिता ॥९॥

टीका ॥ वेद आणि क्रिया मंत्र ॥ मजपासून सर्वत्र ॥ उत्पन्नहोती
पवित्र ॥ सप्तकोटी मुख्यजें ॥१६॥ त्याची जीवन जी क्रिया ॥ ती असे
जंगम प्रीया ॥ ह्मणूनि गुरु आचार्या ॥ श्रेष्टजाणें मी देवी ॥१७॥

क्रियाचार सतेज असतां ॥ तेणें मंत्राची होय सिद्दता ॥ लिंग निष्टे मोक्ष यई हाता ॥ क्षण नलगता साच पै ॥१८॥

॥ श्लोक ॥ लिंग प्राण गुरुर्देवी गुरु प्राणंतु जंगमः ॥ जंगमंच प्रसा-
देन लिंगप्रणंतु शांकरी ॥१०॥

टीका ॥ शिवसांगे आंबेप्रति ममप्राण लिंगमूर्ति ॥ जंगम प्राणाची स्फूर्ति गुरुंरूपें तिष्टतसे ॥१८॥ तया जंगम प्राणाचीव्याप्ति ॥ प्रगट होय त्रिजगती ॥ सकल व्यापार चालती ॥ मद्भक्ति विसरूनिया॥१९॥ ती रहावी अखंड स्थिती ॥ ह्मणूनि निष्ठा गुरु तीर्थी ॥ षोडशोपचारें पूजा करिती ॥ अंतीं घेती शिवतीर्थ ॥२०॥ एका गुरुचें पूजें करून ॥ त्रय मूर्तिचेंघडें अर्चन ॥ तया श्रीगुरु लिंगाव्यापून॥ माझें रूप असें पार्वती ॥२१॥ गुरु पूजा करितांजाण ॥ आदि कीजे लिंगपूजन ॥सवेची स्पर्शी द्वय चरण ॥ वरी मस्तक ठेवूनिया॥२२॥ लिंगरूपीं मीसाक्षांत ॥ ब्रह्मतत्वीं वासकरीत ॥ चरालिंग तोची वर्तत ॥ पवित्र पावन सत्य पै ॥२३॥ यास्तव तीर्थ अविनासे ॥ श्रुतिनें वर्णिले प्रेमेसे ॥ चरणं पवित्रं विततं असे ॥ मंत्रजाण तीर्थाचा ॥२४॥

॥ श्लोक ॥ शोषणं पाप पंकस्य दीपनं ज्ञान चक्षुशः ॥ गुरुपादोदकं तीर्थं संसार द्रुमनाशनं ॥११॥

टीका ॥ शंकर ह्मणे होगिरीजे ॥ पाप लक्षण चिखल जें ॥ त्यातें दूर करवीं सहज ॥ बिंदुमात्र प्राशीता ॥२५॥ हे गुरु तीर्थ विश्वासें शेविता ॥ हृदयीं ज्ञान प्रकाशे तत्वता ॥ संसार वृक्ष छेदून सायुज्यता ॥ निर्वाण मार्ग सूचवितसे ॥२६॥ पार्वती म्हणें हे महेश ॥ गुरुतीर्थ जें अविनाश ॥ तें कैसें करावें विधिस ॥ सत्यसांगा मजलागीं ॥२७॥

॥ श्लोक ॥ प्रणम्य दंड वद्भोमौ गुरु लिंगं पदैक्यतां ॥ श्रेष्ठासने समर्चितो गंध पुष्पा क्षतादिभिः ॥१२॥

टीका ॥ गुरु शिव एके भावेन ॥ तया उत्तमासनीं बैसवून ॥ अष्टांग प्रणिपात करून ॥ अज्ञा घेईजे तीर्था ॥२८॥ गुरु अज्ञा करी प्रेमें ॥ लवलाहीं उटा नेमें ॥ धूप दीप अमू पमें ॥ पूजा कीजे त्रिविध ॥२९॥ सद्योजात मंत्रे करून ॥ तें भस्म लावावें आपण ॥ क्षणामाजी नम्रहोऊन इष्टलिंगा पूजिजे ॥३०॥ दशांगुल्यें चरण कमलीं ॥ स्पर्शोनि शुध्दोदक मिळी ॥ भस्म लावून तयवेळी ॥ सव्य भागी ठेविजे ॥३१॥ मग कीजे

३ लिंगपूजा ॥ निर्जराच्या निजबीजा ॥ पत्र पुष्प धूप राजा ॥ अर्पिता
पुण्यपै ॥३२॥ महापूजाती सर्वांगीं ॥ अर्चुनिया शिवयोगी ॥अंतींकीर्ती
होयजगीं ॥ पुष्पांजळी अर्पिल्या ॥३३॥ नैवेद्य तांबूल दक्षणा ॥ देईजेमौनें
तत्क्षणा ॥ पूजासर्व उतरूंजाणा ॥ चरणधरी आवडी ॥३४॥ पात्रीं
प्रणवलिहूनी ॥ मूळ मंत्र अंगुष्टानीं ॥ ईशान वस्तु ह्मणूनि ॥ उर्ध्वकरीं
दाविजे ॥३५॥ पूर्वी उदकें उपपात्र ॥ टेविलें सर्व लावून सूत्र ॥ तेंची
घेऊनि पवित्र ॥ तीर्थकीजे परवस्तु ॥३६॥ मागें जी सांगीतली श्रुति ॥
ती येथें आदरें उच्चारिती ॥ जय जय कारें गर्जती ॥ मग शेविती
तीर्था ॥३७॥ हेंची जाणिजे ॥ त्रिविध दुजे असें दशविध ॥ परी तें
दश त्रिविध ॥ होतअसे अनुक्रमें ॥३८॥ गुरु तीर्थ पात्रीं असतां ॥ लिंगीं
होय लिंग तत्वता ॥ मुखामानीं प्राशन करितां ॥ जंगम तीर्थ
साचतें ॥३९॥ ही पर सूत्राची मूर्त ॥ याचें कैसें शेवावें तीर्थ ॥ म्हणे तो
नोव्हे शिवभक्त ॥ लिंगधारीवा जंगम॥४०॥तीर्थाभेद धरितां घडे दोष॥
प्रसादा उच्छिष्ट पाप विशेष ॥ जो जाणें तीर्थ प्रसाद नेमास॥तोच वीर-
शैव जाणावा ॥४१॥ जें तीर्थ परम पद दायक ॥ जें होय भव भय ३

मोचक ॥ तया धिःकारितां महापातक॥ भोगीजाण अभक्ततो ॥४२॥ तीर्थ झालीया जाय उठून ॥ किंवा धरून बैसे अभिमान ॥ तो पंचमहापातकीं जाण जंगम अथवा भक्त ॥४३॥ जोम्हणें आणा बैसल्या ठायीं ॥ आचार विधि नेणेंची कांहीं ॥ तो वीरशैव मार्गिचानाहीं ॥ गण वंशज नोंव्हेतो ॥४४॥ तीर्थासी घे म्हणूनये ॥ कोणासही पाचारूंनये ॥ पःचारिता दोषहोय ॥ तो सांगतां नये येथें ॥४५॥ तीर्थाचा वस्त्रास पुसूंनये हस्त ॥भूमीं पाडूंनये तीर्थ किंचित ॥ अद्रें शैवी तो जंगम भक्त ॥ येरें तें ढोंग जाणीजे ॥४६॥ निगुरु यासी तीर्थ नाहीं ॥ गुरु पुत्रादे लवलाहीं ॥ लिंगपूजा सांडून देवता पाही तीर्थ नदीजे त्यासी ॥४७॥ तया भ्रष्टास तीर्थ देता ॥ तो जंगम नोंव्हे सर्वथा ॥ आशा अथवा भीड धरिता॥ तरी तो दोषी होय ॥४८॥ आचार मार्गाचे ठायीं ॥ राव रंका समान ही ॥ मार्गचुकता आग्रसरही ॥ नीच पदासयेई ॥४९॥ धर्मै चाले तो पंचानन ॥ अमार्गें वर्तें तोचि स्वान ॥ वीरशैव धर्म परम पावन ॥ गुरुमार्ग दावितसे ॥५०॥ सप्त सागरीचें जल ॥ सृष्टिचीं तीर्थें सकल ॥ परि गुरु तीर्थी फल ॥ सहस्त्रांशें अधिक ॥५१॥ गुरु तीर्थ बिंदुची

४ सरी ॥ काशी न पावें बरोबरी ॥ मग इतराची काय थोरी ॥ असे पै
वर्णावया ॥५२॥ काशी मरणांतरी करीमुक्त ॥ सद्भावें शेवितां हें गुरु
तीर्थ ॥ तो जिताची होय जीवन मुक्त ॥ तीर्थ महात्म ऐसे हें ॥५३॥
गंगा तीर्थी एक अवगुण ॥ खोल जळीं ही बुडवी जाण ॥ गुरु तीर्थ
नबुडवी ह्मणून ॥ तरूण जाती कैलाशीं ॥५४॥ द्वादश लिंगा करितां
भ्रमण ॥ परि गुरुचे नये महिमान ॥ जो स्वयें ब्रह्म होऊन ॥ शरण
आल्या ब्रह्म करी ॥५५॥ तीर्थावीण बांधिता लिंग ॥ तरी तो पाषाणची
सांग ॥ जया तीर्थाचें न लागें अंग ॥ तरी तो लिंगची नोव्हे ॥५६॥
तीर्थावीणें लिंग तो पाषाण ॥ तीर्थ असे लिंगाचें जीवन ॥ त्या शेव-
ना पासून चैतन्य ॥ लिंगाप्रति सदा असें ॥५७॥ स्वधर्मी निष्ठा नसे
जाण ॥ व्यर्थ मिरवी जंगम पण ॥ तीर्था सांडून करी कारण ॥ जैसें भा-
षण अर्भकाचें ॥५८॥ जया तीर्थी नाहीं आवडी ॥ तया प्रसादाची काय
गोडी ॥ पायीं पडली संसार बिडी ॥ कल्प कोटी नतुटे ॥५९॥ विश्वासें
जे शेविती तीर्थ ॥ ते शिव गणा मार्जी जात ॥ तया पुढें मुक्ति राबत ॥
कर जोडून सर्वदा ॥६०॥ तीर्थ करावें जया मुर्तिचें ॥ शुद्ध सर्वांग ४

असावें त्याचें ॥ तीर्थ न करावें अंग ही नाचें ॥ ऐसें शास्त्र वदतसें ॥६१॥ कर आणि द्वय चरणीं ॥ बोटें गेलीं जरी तुटूनी ॥ शरीर व्यापिलें रोगें करूनी ॥ तरी तया वर्जावें ॥६२॥ नासिक नयन कान ॥ गेलें असेल छेदून ॥ तयाचें तीर्थ शेवन ॥ करूं नये हो देवी ॥६३॥ जो क्रोधी द्वेषी तामसी ॥ जो जंगम द्रोही करी हिंशेशीं ॥ शेवूं नये तयाचे तीर्थाशी ॥ परि भोजन द्यावें ॥६४॥ जया अंगीं कुष्ट असता ॥ पाद पूजा न कीजे सर्वथा ॥ स्वान जंबूक दंश होता ॥ नसे योग्य पूजेशी ॥६५॥ पूज्य मूर्तिशी द्वेषें करून ॥ जरी लाविलं अन्य दूषण ॥ तरी तो अपूज्य होय जाण ॥ दोष मुक्त पावेतों ॥६६॥ या लागीं भूरुद्र देशिकानीं ॥ सर्वदा अलग वर्तावे जनीं ॥ अधिकार गुरुत्व पूर्णपणीं ॥ संपादावें निर्दोषें ॥६७॥ जो शिव योगी सर्वांगीं पहातां ॥ निर्दोष मूर्ति असे तत्वता ॥ तोची पूजे योग्य धर्म वक्ता ॥ लिंगीं निष्ठा असे ज्याची ॥६८॥ सुशील आणि शांत भाविक ॥ जंगम भक्ति नित्य साधक ॥ धर्म अधर्म करि विवेक ॥ पाद पूजा कीजे त्याची ॥६९॥ सत्व गुणी भक्त जन ॥ तो आवडे प्राणाहून ॥ उभय ऐक्य झाल्या वीण ॥ पूजा नोव्हे

सर्वथा ॥७०॥ उभयता शुद्धासनें ॥ असावीं दुकूल परिधानें ॥ पूजा तीर्थातें शेवनें ॥ असन करें काढीका ॥७१॥ ऐसा ऐकून तीर्थ महिमा ॥ परम संतोषली उमा ॥ ह्मणे धन्य धन्य पर ब्रह्मा ॥ सदा शिवा तुज नमो ॥७२॥ मज निरोपिला तीर्थ महिमा ॥ तो न वर्णवें निगम आगमा ॥ एका वीरशैवा पुरुषोत्तमा ॥ सुक्ष्माचार कळेची ॥७३॥ परी ते वीरशैव कैसे असती ॥ कवण क्रीया कैसे वर्तती ॥ नेम चुकता देह त्यागीती ॥ लिंगा जपती प्रीतीनें ॥७४॥ ऐसे एक निष्ठ वीरशैव ॥ मज कळविले उमा धवें ॥ परि धर्म शास्त्राच्या प्रभावें ॥ पुढें अर्थ रस बहू ॥७५॥ इति श्री परम रहश्य सारामृत ॥ उमा महेश्वर संवादीं वर्तत ॥ त्याची टीका करूनि प्राकृत ॥ कृत कृत मन्मथ ॥७६॥ इति श्री द्वितीयो ध्याय संपूर्णमस्तु ॥ ॥छ॥

॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

श्रीगुरु परब्रह्माय नमः ॥ निर्गुण स्वरूपाय नमः ॥ श्लोक ॥
पार्वती उवाच ॥ कःमार्ग वीरशैवानां कासां स्थिती काधारणा ॥
कापूजा निष्टा लिंगार्चा ब्रुहिमे परमेश्वर ॥१॥

टीका ॥ कोण मार्ग स्वामी वीर शैवाचा ॥ काय धारणा स्थिति नेम त्यांचा ॥ कवण्या निष्टें करित लिंगार्चा ॥ तो प्रकार सांगामज ॥१॥

ईश्वरु वाच ॥ श्लोक ॥ लिंगार्पितं विनाभुंक्ते भुंक्तेते विष भुंक्तच ॥
गत्वा लिंग त्यज्यत्प्राण यथा वीरशैव मम ॥२॥

टीका ॥ शिव ह्मणे पार्वती प्रती ॥ ऐक वीर शैवाची कीर्ती ॥ नातुडे वर्णावया स्फूर्ति ॥ एकनिष्ठ व्रतजे ॥२॥ लिंगा अर्पित केल्या वांचून ॥ कांहीं पदार्थ नकरी शेवन ॥ पात्रीं अर्पिल्या वीष ह्मणून ॥ न सोडी कदांही ॥३॥ लिंग ह्राच जयाचा प्राण ॥ तो हरवता त्यजी-प्राण ॥ असे हें वीरशैव लक्षण ॥ जाण देवी साचपे ॥४॥ ह्रा मार्ग असे पतित पावन ॥ यामार्गी चालती विरक्तजन ॥ त्यावंदितां तुटे भवबंधन ॥ चौऱ्याऐसी जीवाचें ॥४॥ जो वीरशैव मार्गीचापुरा ॥ तोच क्रियाचारें आणीनिरा ॥ अनुमात्र भंगता अचारा ॥ प्राणची त्यागूं पाहे ॥५॥ जो असे

१ लिंगीं प्रविष्ट ॥ तो लिंग बनला श्रेष्ठ ॥ लिंग गेलीया वरिष्ठ ॥ देह कैसा
धरील ॥६॥ आधींच लिंगीं प्राण भरला ॥ तो कैसा असे देहीं उरला
॥ लिंग गेल्या मागें संचरला ॥ पिशाचवत जाणावें ॥७॥ लिंग हृदयींचें
जीवन ॥ लिंग प्राणाचा होय प्राण ॥ लिंग प्राण सम होऊन ॥ प्राण
लिंगीं बोलती ॥८॥ जो लिंग गेलिया देह ठेवी ॥ ऐसे कधीं नघडे
देवी ॥ पति गेलिया राहे जीवीं ॥ तरी पतिव्रता नोव्हे ॥९॥ तेवीं लिंग
गेलीया जो राहे ॥ तो वीरशैवची सत्य नोव्हे ॥ जैसा प्राण गेलीया
देह ॥ तैसे प्रेत वत जाणिजे ॥१०॥ लिंगा विणें जे वांचणें ॥ तें प्रेता
सम जाणणें ॥ कीं भ्रतारा वीणें जीणें ॥ शोभे विधवा जैसी ॥११॥
कोणी ह्मणती विधवा ॥ देवें उणें केले धवा ॥ तरी नूतन बरवा ॥ वर
पाहत प्रीतीनें ॥१२॥ जरीं दुजा भर्ता केला ॥ तरी पतिव्रता महिमा
गेला ॥ तैसा लिंग दुजा आणिला ॥ तरी द्वि विधा भक्ति होय ॥१३॥
एकविध ह्मणती ज्याला ॥ लग्न पतिच्या शेवेला ॥ तैसा होता जन्म १
कालां ॥ लिंग देती प्रीतींनें ॥१४॥ तोची प्रेमें करावा जतन ॥ वीर
शैवाची मूळ खूण ॥ ग्रंथांतरीं अवलोकून ॥ भ्रष्टाचारें न वर्तावें ॥१५॥

ह्मणूनि लिंगाठायीं ज्याचा प्राण ॥ तोची वीरशैव महागण ॥ क्रिया कर्म निष्ठा परिपूर्ण ॥ तारक शिवा चाराशी ॥१६॥ भवी देखता अनु- मात्र ॥ न अचरे जो स्वकर्मत्र ॥ त्यानें साधिलें ह्मो परत्र ॥ सत्य जाण वोदेवी ॥१७॥ इंद्रिय द्वारा दमन ॥ मन करी आत्म लीन ॥ जीव शिवातें जाणून निमग्न राहे सदा ॥१८॥ त्याचें लागतां चरणीं ॥ कृपा करी तेंची क्षणीं ॥ अजात भक्ता नयनीं ॥ अश्रु पात होतसे ॥१९॥ भोजना विणें आन कांहीं ॥ घेणेंची जया दुजें नाहीं ॥ सोनें रुपें तांबें तेंही ॥ हस्त स्पर्श कदां नोहे ॥२०॥ नेमें शट् काल करी पूजा ॥ तितुकीं स्नानें हिमनगजा ॥ न्यास ध्यान युक्त सहजा ॥ अत्यादर मंत्र पुष्पें ॥२१॥ याकरितां मी सुंदरी ॥ वसें वीरशैवां मंदिरीं ॥ पुजांतीं प्रसाद थोरी ॥ असें जाण तेथेंची ॥२२॥ शिव भक्ताचें घरचें [illegible] ॥ करी अज्ञान जनां पावन ॥ कीं तेंअसे सत्य शिवार्पण ॥ अन्यार्पण नसेंची ॥२३॥ जें जें असे शिवार्पित ॥ तेंतें जाण परम पुनित ॥ तें शेविल्या तोही मज पावत ॥ अनयासें उद्धरें ॥२४॥ सहा पूजेच्या कवण वेळा ॥ मज सांगाजी स्नेहेळा ॥ गुप्त ठेऊनकायवेळां ॥

२ सत्वर प्रगट करी ॥२५॥ पहिली पूजा अरुणोदयीं ॥ दुजी असे प्रहरा
ठायीं ॥ माध्यान्हीं तिसरी पुण्य देई ॥ वर्णिलिसे वेदागमें ॥२६॥
तिसरे प्रहरीं चौथी जाण ॥ पांचवी सायंकालीं पूर्ण ॥ एकात्म्यां कर्पूर
नीरांजन ॥ प्रेमभावें अर्पावीं ॥२७॥ सहावी षड्गुणैश्वर्य देती ॥ मध्य-
रात्र तया ह्मणती ॥ षट्पुजेची झाली भरती ॥ लिंग पूजा श्रेष्ठा
हे ॥२८॥ त्रिकाळ पूजाती मध्यम ॥ वीरशैवांचा नित्यनेम ॥ न करी
तो पशू अधम ॥ शैव कुळीं जन्मला ॥२९॥ लिंग पुजें वीरशैव ॥
सदां पावती वैभव ॥ कदां न टाकिती पाव ॥ लिंगार्चन सोडोनी ॥३०॥
अलिंगी अथवा लिंगधारी ॥ जो शिवधर्म निर्भर्त्सना करी ॥ त्याचे
मुख न पाहे कांतारीं ॥ तो वीरशैव जाणावा ॥३१॥ जया वस्त्राची
परवा नाहीं ॥ घोंगडी एक असन तेही ॥ परी [illegible] वस्त्री लिंगा
वाही ॥ आपण राहे तैसाची ॥३२॥ कौपीन जोडी शुद्धि करितां ॥
हस्त पाऊड हतीं धरितां ॥ सोहं सोव्हळा पवित्र युक्ता ॥ शोभे भाळीं
त्रिपुंड्र ॥३३॥ रुद्राक्ष माळा शोभे गळा ॥ स्नान पूजेची यावेळां ॥ २
न देखे भवी जन मेळा ॥ भाषण कदां न करी त्यातें ॥३४॥ पायीं

नसून .पादुका ॥ न चालावें मार्गी देखा ॥ वाहनीं बैसावें अनेका ॥ देश
संचारा कारणें ॥३५॥ शिष्य आचार करी पूर्ण ॥ देशीका दे यथा भोजन
॥ त्यांतें स्वयें संतोषून ॥ आनंद मानितसे ॥३६॥ ज्ञान वैराग्य क्रियेसी ॥
राखीतो वीरशैव वंशी ॥ क्रिया सोडून चालें त्याशीं ॥ शिक्षेनें मार्गा
लावी ॥३७॥ जो झालासे क्रिया त्यान्य ॥ तया कोण मानी पूज्य ॥
अधर्मे वर्तता राज्य ॥ नष्ट होय पराक्रम ॥३८॥ जरी ज्ञानें पूर्ण झाला ॥
स्वधर्माचारें मान त्याला ॥ अजात होता व्यर्थ गेला ॥ जन्मा येऊ-
निया ॥३९॥ त्यानें अनेक परोपकार ॥ केलीं तीर्थे लहान थोर ॥
तैसेची दानें अपार ॥ गो वाजी रथ दिलें ॥४०॥ तरी क्रिये वीणजें
पुण्य ॥ तें सुकृत्यास होय ऊणें ॥ ह्मणूनि नटाकिजे सज्जनें ॥ क्रिया
चारासी ॥४१॥ जैसे अंधा मार्गी लावणें ॥ आपण ही हळू चालणें ॥
तैसें अज्ञान जना नेणें ॥ आचार धर्म पंथें ॥४२॥ ऐसा परोपकारी
पुरुष ॥ पटाधिकारी बोलिजे त्यास ॥ तोची तारक शिवाचारास ॥
धर्म गुरु ह्मणती तया ॥४३॥ आशा धरून बोधीना ॥ स्वपूजा मान
इछीना ॥ कदां पर स्त्री पाहिना ॥ सम दृष्टि सर्वदां ॥४४॥ जीव हिंसा

३ जो न करी ॥ दुःखीया दुःख निवारी ॥ परी कोणी खेद करी ॥ ऐसें
बोलणेंच नसें ॥४५॥ जयाचें नांव विरक्त ॥ तो विषया नोव्हे लिप्त ॥
श्वान वमन मानीत ॥ भोग विलास सर्वतें ॥४६॥ तैसेची लोह कांचन ॥
रत्न गार जया समान ॥ कोणी करूं मानापमान ॥ परी तो आनंद
भरीत ॥४७॥ तयाप्रती प्रीय कांहीं ॥ मज वांचून उरलें नाहीं ॥ वाचें
स्तुति पल न राही ॥ सदां उच्चारीं शिव शिव ॥४८॥ कोणी केली
जरी निंदा ॥ हर्ष मानी तया शब्दा ॥ मानापमानाचे भेदा ॥ न
जाणें विरागीतो ॥४९॥ दया क्षमा सर्व अंगीं ॥ ध्यान धारणा वामांगीं ॥
शांती असे मध्य भागीं ॥ कुबुद्धिस थारा कैंचा ॥५०॥ नाहीं जाणवेचा
तोरा ॥ अहंकाराचा ही वारा ॥ तोची वीरशैव खरा ॥ शिवयोगीया
श्रेष्ठ ॥५१॥ ज्ञानाग्निनें इंद्रियद्वार ॥ दग्धकेले षड्विकार ॥ तो निरा-
कार निर्धार ॥ देह असून विदेही ॥५२॥ काम क्रोध द्वेष मत्सर ॥
लोभ मोह दंभ अहंकार ॥ निंदा कुचाळे चेष्टा व्यापार ॥ स्वप्नीं नये
जयाच्या ॥५३॥ भवमाया न करी जंजाळ ॥ चिंता उद्वेगना हळहळ ॥
मन असें सर्वदां निर्मळ ॥ उज्वळ मोति जैसें ॥५४॥ जो सकळ ३

तिर्थांचा अधिपती ॥ चरणस्पर्शें पावन होती ॥ जगउद्धारा तें विचरती ॥ निष्काम बुद्धि सर्व तीर्थें ॥५५॥ कोठें गोडी धरूनि न थोकें ॥ मान दिधल्यानहरिके ॥ अपमान केलिया कौतुके ॥ मानी त्रिकाल आनंद ॥५६॥ तोमृत्यु लागीं न भियी ॥ मरण जयाचें स्वप्नीं नाहीं॥ जन्माची आठवण वाही ॥ जगहिता कारणें ॥५७॥ बाल वृद्धाप आणि तारुण्य ॥ नम्र उद्धता लाजीरवाणे ॥ त्यजून गर्वा धरी कारुण्य ॥ राहे निमग्न स्वात्मरूपीं ॥५८॥ जयाचा गर्भेच मंत्र पिंड ॥ संस्कारीं उपजला मार्तंड ॥ अविद्या अनाचार बंड ॥ हे तम राहतेकेवीं ॥५९॥ गुरुकृपें धर्म उचित्त ॥ क्रियेलागीं मस्तकीं हस्त ॥ पावल्या सहज ज्ञान प्राप्त ॥ मग अज्ञान कायसें ॥६०॥ आत्मा स्वयें सिद्ध असे ॥ तया ज्ञानाज्ञान नसे ॥ जीवालागीं ज्ञानवसें ॥ देह पावना कारणे ॥६१॥ पहातां देह अपवित्र ॥ पावन केले गुरुमंत्रें ॥ आत्मा वस्तु स्वतंत्र ॥ ऐक्य केलें जीवात्म ॥६२॥ ऐसा हा बोधिता बोध ॥ कोंदला परब्रह्मीं नाद ॥ बोलें चालें तोची शब्द ॥ नसे चित्त संसारीं ॥६३॥ कायें वाचें मनें जगाशी ॥ सुख देणें दिवस निशीं ॥ लावी सदाचार वर्तनासी ॥ तो

४ विरक्त जाणावा ॥६४॥ पुढें पाहून चालणें ॥ जीव मात्रास राखणें ॥
सर्वांघटीं तें जाणणें ॥ सोहं ब्रह्मरूप ॥६५॥ सदा शम दमीं वर्तत ॥
अखंड वैराग्य ज्ञान भरीत ॥ सांगे षट्स्थल ज्ञानमात ॥ अष्टावर्ण
क्रीयापै ॥६६॥ असाहा विरक्त पुरुष ॥ जाणावा तो अविनाश ॥
चिन्मात्र स्वयें प्रकाशे ॥ शिवयोगी साक्षांत ॥६७॥ जी वस्तु अगम्य
अगोचर ॥ अव्यक्त अनंत परात्पर ॥ ब्रह्मरूपाचें हें बीजांकुर ॥ घवं-
घवित विरुढलें ॥६८॥ जे अद्वैत अनुपम ॥ अलक्षाचल अनाम ॥ तेची
तो ब्रह्म निसिम ॥ होऊनिया ठेला ॥६९॥ ते चिद्रुप चिन्मात्रैक ॥ जे
चिदानंद चित्प्रकाशक ॥ तेची तो समरस एक ॥ होऊनिया राहे ॥७०॥
ऐसे जे वीरशैव मार्गिक ॥ ते स्वयें स्वतंत्र सुख दायक ॥ तया मज नसे
वेगळीक ॥ हे पार्वती ऐकपै ॥७१॥ ते मज क्षण न विसंबती ॥ मीही
तैसाची तया प्रती ॥ ह्मणूनि जगीं जन पूजिती ॥ अत्यादरें करूनी ॥७२॥
आह्मी त्याचें ध्यान ध्याऊं ॥ स्वयें त्याचें गुण गाऊं ॥ तया गुरुत्वें
मानूं भाऊं ॥ लिंग निष्टें करूनिया ॥७३॥ तो देव आह्मी भक्त ॥ तया ४
ध्याऊं हृदयांत ॥ आह्मां देवपण निश्चित ॥ तयाचे नियोगें ॥७४॥ तो

प्राणसखा आह्मां ॥ नसे द्यावया उपमा ॥ गुरुत्वाची झाली सिमा ॥
जंगम मूर्ति परियसी ॥७५॥ स्थावर लिंगा जे ध्याती तया स्थावर गुरु
ह्मणती ॥ उपासनेची निजस्थिती ॥ कार्या कारण असे ॥७६॥ कर्म
उपासने बांधुनिगाटी जे सार्वकाल वाहती कंठीं ॥ नकरी दुजी वाटा-
वाटी ॥ चरलिंग त्या ह्मणिजे ॥७७॥ तोची जाणावा पराशिव ॥ गुरु
मुखे घ्यावा अनुभव ॥ आमुचा त्यावरी पूर्ण भाव ॥ नसे पर वस्तु
आणीक ॥७८॥ तो सर्वा गुरुरूप होय ॥ त्याचे जो भावे वंदी पाय ॥
तो तैसाची होऊन जाय ॥ निमग्न शिवरूपीं ॥७९॥ तया सर्वश्व
भजावे ॥ तनुमन धन अर्पावें ॥ अन्न वस्त्र पाठवावें ॥ गुरु बंधु
ह्मणोनी ॥८०॥

॥श्लोक॥ आनंता वीतहे नोपे गुरुवे तत्प परायणः कृत दाता
नमस्कारं स्वशरीरं निवेदयत्

टीका ॥ जयापाशीं वित्त नाहीं तेणें शेवा लवलाही ॥ करून असावे
गृहीं तत्पर होवोनिया ॥८१॥ ऐशी अंगें करितां शेवा तरी शिवपद
हाय जीवा ॥ गुरुते भाविता ब्रह्मभावा ॥ तरी स्वयें ब्रह्मची होय ॥८२॥

२१

ऐसा वेदांतीचा भाव ॥ गुरु न ह्मणावा मानव ॥ ह्मणता दोष अभिनव ॥ घडती सत्य जाणा ॥८३॥ गुरु परब्रह्म भाविजे ॥ तरी स्वयें ब्रह्म होईजे ॥ नमानी असत्य ताजे ॥ तेची मुक्त होतसे ॥८४॥

॥ श्लोक ॥ कर्मणा मनसा वाचा

टीका ॥ कर्म क्रिया मनबुद्धि ॥ गुरु शेवेशीं जो साधी ॥ तया प्राप्त अष्टसिद्धि ॥ आणि मोक्षपद पावें ॥८५॥ गुरु वांचून सर्वथा ॥ असे कोण ती देवता ॥ गुरु मंत्राविणे तत्वता ॥ फल नसे जापकाशी ॥८६॥ जे गुरु अज्ञें वर्तती ॥ गुरु संतोषे याचरीती ॥ तया कृपा तीच मुक्ति ॥ सत्सिष्यासी होय पैं ॥८७॥ ऐसें गुरु भक्त जे पार्वती ॥ तयाची मज अत्यंत प्रीती ॥ ऐकून संतोषे मूळ शक्ति ॥ चरणीं माथा ठेवितसे ॥८८॥ ह्मणे मी न नेणें या वर्मा ॥ निवेदिला गुरु महिमा ॥ धन्यधन्य भक्त विश्रामा ॥ कृपा केली मजवरी ॥८९॥ गुरु महिमा सादर ॥ ऐकता श्रोते चतुर ॥ पावन होती सत्वर ॥ भवार्णवां पासूनी ॥९०॥ पुढें प्रश्न करी पार्वती ॥ ऐकून तोषे पशुपती ॥ अति रहस्य उमेप्रती ॥ निवेदील शिवतो ॥९१॥ इतिश्री परम रहस्य ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

श्रीगुरु भ्योनमः ॥ श्लोक ॥ पार्वत्युवाच ॥ कोवा मोक्षश्च बंधश्च मोक्ष बंधा तितंचकिं ॥ देव प्रीत्या मम ब्रूही प्रणम्य शिरसा प्रभुं ॥१॥

टीका ॥ पार्वती विनवी देवाप्रती ॥ बंध मोक्षाची निवेदा स्थिती ॥ बंध मोक्षातीत कैसे वर्तती ॥ सलक्षण मज सांगा ॥१॥ ॥ श्लोक ॥ ई० उ० ॥ श्लोक ॥ निरहंकारी शांतश्च सर्व संकल्प वर्जितः॥ तद्रुपं ब्रह्म भावेति येतन्मो क्षस्य लक्षणं ॥२॥

टीका ॥ निरहंकार सदा शांती ॥ सर्व संकल्प विकल्प निमती ॥ तद्रुप ब्रह्मची होऊनी असती ॥ हेंच लक्षण ब्रह्मीचें ॥२॥ मी पण ब्रह्म निश्चयेसी ॥ नास्ति देखे भेदांशी ॥ आपणावीण नदेखे कोणाशी ॥ तोचि मोक्ष जाणावा ॥३॥ इंद्रिय व्यापारा बोळवण ॥ ध्यान धारणा निमाले साधन ॥ निमाली बुद्धि मन हें उन्मन ॥ तोची मोक्ष जाणावा ॥४॥ जैशी गंगा सागरीं मिळाली ॥ ती नपर्ते सागरची झाली ॥ तैशी वृत्ती चैतन्नीं समरसली ॥ तोची मोक्ष जाणावा ॥५॥ त्वंपद तत्पद अशी पदाचा ॥ शुद्ध शबलांश निवडिजे याचा ॥ उभय शबलांश टाकूनी साचा ॥ मथीत ऐक्य बोध जो ॥६॥ ऐक्य बोध तेंची

१ अशीपद ॥ जें जीविचें पूर्ण ब्रह्मानंद ॥ जाणून असे सदा सिद्ध ॥ तोची
मोक्ष जाणावा ॥७॥ सच्चिदानंद पद जाणून ॥ त्याचे साक्षे निजानंद
घन ॥ स्वयें झाला जो आपण ॥ तोची मोक्ष जाणावा ॥८॥ आतां
विशेष मोक्ष ऐक ॥ जेथें साक्षित्व निमाले देख ॥ तेथें दुजानुरे अनेक ॥
गुज गोष्टी सांगावया ॥९॥ आणि बद्धता जेथें नाहीं ॥ तेथें मोक्षाची
वार्ता कांहीं ॥ वर्म न नेणें ह्मणून पाही ॥ बद्ध मोक्ष जाणविती ॥१०॥
आतां बद्धता ती ऐक ॥ ती दुष्कृताचे साह्यक ॥ सांगूं तुज अधुनिक ॥
बद्धता लक्षण पै ॥११॥ जो अहंकारें गर्वित ॥ कामानळें विषयीं लुप्त ॥
अविवेकी अधर्मी वर्तत ॥ तोची बद्ध जाणावा ॥ १२ ॥ मी आचार्य
महागण ॥ आमुचे क्रिये पुढें कोण ॥ ऐसा वाहे अभिमान ॥ तोची
बद्ध जाणावा ॥१३॥ अहंता मदें अखंडीत ॥ मी तूं भेद वाहे मनांत ॥
काम कर्दमीं जयाचें चित्त ॥ सदा धुसधुसीत पै ॥१४॥ असें बद्धतेचें
लक्षण ॥ यालागीं व्हावें सावधान ॥ श्री सद्गुरुसी नमून ॥ कृपा हस्त १
दान मागा ॥१५॥ परी आह्मी वीरशैव जंगम ॥ आह्मापुढें कोण
उत्तम ॥ आह्मीच जाणूं लिंगवर्म ॥ ह्मणता पावें बद्धता ॥१६॥ जळीं

देखता स्वछायेसीं ॥ मी बुडालों ह्मणें मानसीं ॥ तेवीं आलीया संसाराशीं ॥ मीच कर्ता भावितसें ॥१७॥ स्वप्नीचिये घाये करून ॥ जागृती ह्मणें कैसा वाचेन ॥ असत्य संसारा सत्य मानून ॥ भ्रमा माजीं सांपडती ॥१८॥ पर वस्तुचें विस्मरण ॥ अत्यंत विषयाचें ध्यान ॥ विकल्पें भरलें मन ॥ बद्धतेस कारण हें ॥१९॥

॥ श्लोक ॥ संकल्प विकल्प मनं सक्रोध अहंता शांतं ॥ भवस्या त्सुखं भावी तस्य बद्धोपिलक्षणं ॥३॥

टीका ॥ संकल्प विकल्प जाचें मन ॥ मी कर्ता हा वाहे अभिमान ॥ काम क्रोधें अतृप्त रात्रंदिन ॥ बद्धा कारण येणें होय ॥२०॥ नाशिवंत संसारीं सुख ॥ अत्यानंदें मानी मूर्ख ॥ ब्रह्मभावना नाठवी देख ॥ बद्धा कारण येणें होय ॥२१॥ कुबुद्धि कूकर्माचा नाद ॥ विषयीं काग जैसा सावध ॥ नघे शिवपूजेचा स्वाद ॥ बद्धा कारण येणेंची ॥२२॥ ऐसी बद्ध मोक्ष लक्षणें ॥ तुज नीरोपिली ये क्षणें ॥ आतां बद्ध मुक्तातीत समजणें ॥ अवश्य असे हो देवी ॥ ॥२३॥ परी तो नकळे सहज ॥ अगम्य अगोचर तूज ॥ मी सांगेन परमगूज ॥ लक्ष देई आदरें ॥२४॥

तो शास्त्र पुराणा नकळें ॥ जप तप ध्याना नवळें ॥ जो तदाकारवृत्ती बळें ॥ विचरतसे मही ॥२५॥ त्यांचें होतां मानवा दर्शन ॥ त्याचें तुटे भवबंधन ॥ तो मज पावला जाण ॥ स्तन पान नकरी कदां ॥२६॥

॥ श्लोक ॥ बद्द मोक्ष द्वयं नास्ति नास्ति लोभ भयंयथा ॥ उभयोः साक्षी अजो नित्यं ब्रह्म ज्योति रंततथा ॥४॥

टीका ॥ शंकर म्हणे पार्वतीप्रती ॥ अलक्ष लक्षी ब्रम्हज्योति ॥ तेथें लोभ भय उभय वस्ती ॥ नसे कदांकालीं पै ॥२७॥ जो लोभें नाहीं बांधला ॥ तो भवभया चुकला ॥ ह्मणून तो मुक्तचि बोलीला ॥ लोभें केला बद्दएके ॥२८॥ जो बद्द मोक्ष उभय पक्ष ॥ जाणोनि असें सर्व साक्ष ॥ त्याकेवीं बाधे बद्द मोक्ष ॥ सदा सावध स्वरूपीं ॥२९॥ जेथें द्वैत भावनुरे ॥ तेथें साक्षकासया दुसरें ॥ परी जाणावया लागी चतुरे ॥ खूण मात्र बोलती ॥३०॥ येरव्हीं ठाव नाहीं जाला ॥ पन्नास अक्षरीं जीरला ॥ चारीवाच्या गजर निमाला ॥ त्या कोण बोलवी ॥३१॥ परी एक नवल असे ॥ तें शब्दा मार्जी वसे ॥ शब्द निमालिया अविनासे ॥ हाता नये कोणाच्या ॥३२॥ जैसा काष्टीं वसे अग्नि ॥ मंथील्या टाकी जाळूनी ॥ मग आपणही जाय

विरूनी ॥ उरें ठायीं भस्मलेश ॥३३॥ तैसे इंद्रिय विकार अज्ञान ॥ जिंकुनी संपादिलें ज्ञान ॥ त्याचें न मिरवी भूषण ॥ त्या विज्ञान बोलिजे ॥३४॥ बद्धता हें मृगजल ॥ मोक्षरूपीं कीर्ण केवळ ॥ उभयां साक्ष सूर्य मंडळ ॥ तेवी प्रकाशमय पै ॥३५॥ तिसरा प्रगटता पुरुष ॥ प्रकृति पुरुषाचा करी नाश ॥ जैसा काष्टीं प्रगटता हुताश ॥ जाळीतसे काष्टातें ॥३६॥ दृश्य द्रष्टातें लोपून ॥ महाद्रष्टा दृष्टि लावून ॥ जेथें असे प्रकाश पूर्ण ॥ तेथें अस्थिर मानूनको ॥३७॥ कर्पूर अग्निनें जाळीला ॥ सवेची अग्निही विझाला ॥ परी परिमळ असे उरला ॥ नास्तित्व साक्षपे ॥३८॥ आणि साखरेचा रवा जैसा ॥ उदकीं विराला सहसा ॥ परी गोडी राहे पात्रीं शेषा ॥ ऐसेच जाण विज्ञान ॥३९॥ दृश द्रष्टाच निमालें ॥ परि उभयां साक्ष उरलें ॥ उरले पणाविणें संचलें ॥ तेंची असें पूर्ण ब्रम्ह ॥४०॥ दृशातें कांहीं न दिसे ॥ ज्ञानानेंही न भासे ॥ म्हणूनी भ्रम मानसे ॥ होऊं न देणें सत्य ॥४१॥ कांहीं नसून असे ॥ परी असूनही नसे ॥ जाण तयाही जाणतसे ॥ तरी जाणपण नाहीं॥४२॥ जर दुसरेपण असते ॥ तर जाणीवपण साजते ॥ जेथें प्रळयांबुचें भरतें

२ तेथें प्रवाह कोठूनी ॥४३॥ जैसे जागृति ना स्वप्न ॥ सुशुप्ती ही
जाय जीरून ॥ कीं प्रळय तेजें ग्रासिलें रात्रंदिन ॥ तों आवघा प्रका-
शमय ॥४४॥ तेवीं पुरुष प्रकृति मिळून ॥ ओहं सोहं जाय निमून ॥
मागे जे उरे तो घनानंदपूर्ण ॥ तें निज स्वरूप माझें ॥४५॥ तिन्ही
देवा उत्पन्न विश्राम ॥ माझेच सत्यें सृष्टिकर्म ॥ चालविता परब्रह्म ॥
मीच वर्ते सर्वाठायीं ॥४६॥ त्यामाझें मूळ स्वरूपा ॥ विसरूनिया जन्म
खेपा ॥ अज्ञान जीवाचिया पापा ॥ माझें नाम भस्मकरी ॥४७॥ मज
मुळीं नाम ना रेखा ॥ रूप ना शब्द दिवस एका ॥ रात्रीचा नाहीं ठाव
देखा ॥ प्रकाशमय पूर्ण असे ॥४८॥ तेंची ध्येय ध्याता ध्यान ॥ नसे
ज्ञेय ज्ञाता ज्ञान ॥ कर्ता ह्मणविता कवण ॥ असाक्ष जाण तेथीचें ॥४९॥
एक माझी स्फूर्ति जाण ॥ जागृत असे अनुदिन ॥ तीचे शब्दें हें गगन ॥
उत्पन्न झालीं तत्वेंपै ॥५०॥ तया कारणें मी सगुण ॥ रूपा आलों देवी
जाण ॥ मागुती तूं शक्ति आणि गण ॥ उत्पन्न केलें ब्रह्मा विष्णु ॥५१॥ ३
मी भोक्ता भोग्य भोगातीत ॥ माया मोह विरहित ॥ साध्य साधन
जाणत ॥ तोच वेद जाणपा ॥५२॥ जेथें विवेक शब्द बुडाला ॥ अनुभव

ज्ञानासी झगटला ॥ श्रोता वक्ता स्तब्ध झाला ॥ तेथें कोण कोणा
देखे ॥५३॥ देखणारा देखावयासी ॥ भाव भावितां भावनेसी ॥ गुरु
शिष्यातें उपदेशी ॥ ब्रह्मानंद तेथींचा ॥५४॥ तो गुरु शिष्याचा संवाद ॥
जो निजानंदाचा आनंद ॥ निजें बोधाचा पूर्णकंद ॥ निजरूप
आमुचें ॥५५॥ तें आले नाहीं गेलें नाहीं ॥ जन्मलें नाहीं लय नाहीं ॥
विरुढून अखुंटित पाही ॥ स्वस्वरूपीं निमग्न ॥५६॥ तया ज्ञानेंच
जाणणें ॥ जाणतांच विरझणें ॥ तेंरूप आपण होणें ॥ तोच स्वयें
ब्रह्म ॥५७॥ परी हें जाणावयातें ॥ भेदाभेद दुजी यातें ॥ न विचारिता
आपणातें ॥ कैसेपरी कळेल ॥५८॥ ह्मणून भेदच अभेद जाणिजे ॥
सगुण ते निर्गुण ओळखिजे ॥ येणें परब्रह्मां पाविजे ॥ तद्रुपता हीच-
पै ॥५९॥ ह्मणसी ब्रह्म कैसे असे ॥ तें चर्मचक्षु तें न दिसे ॥ ज्ञानांजनें
पूर्ण भासे ॥ सत्य जाण पार्वती ॥६०॥ घ्राणीं पुष्पा माझारीं ॥ परिमल
न दिसे जरी ॥ तरी नाहीं ह्मणता नये गौरी ॥ स्वादेंद्रिया सुख
होय ॥६१॥ कीं चंद्र बिंबा माझारीं ॥ प्रभा न दिसे साजरी ॥ परी
भूमंडलावरी ॥ प्रकाश भरला असे ॥६२॥ तैसें पर वस्तु जाण ॥ चराचर

४ असे व्यापून ॥ त्याची जाणावया खूण ॥ गुरुसी शरण रिघावें ॥६३॥
आतां बहु करितां कथन ॥ तरी ग्रंथ होय विस्तीर्ण ॥ जें निरोपिलें बीज
खूण ॥ ती विसरूं नको देवी ॥६४॥ जें माझें जीवीचें जीवन ॥ जग
उत्पत्तिचें कारण ॥ तुज म्यां केलें निरोपण ॥ अत्यानंदें करूनी ॥६५॥
जें दुर्लभ ब्रह्मादिकासी ॥ जें अनिर्वाच नये लक्षासी ॥ जें न भासे वेद
शास्त्रासी ॥ तें तूज सांगितलें ॥६६॥ अशी वस्तु जी पार्वती ॥ तेची
वीरशैव अवतरती ॥ तया शिवयोगी बोलती ॥ माझेच अंश जाणते ॥६७॥
ते मजला सदा पूज्य ॥ उदास वृत्ती महाराज ॥ ज्याचें क्रियाचाराचें तेज ॥
दूरकरी भवातें ॥६८॥ जया लोह सुवर्ण समान ॥ तैसाची मान अपमान ॥
अरी मित्रा प्रिय मानून ॥ सदा मुक्त जंगम तो ॥६९॥ सहज मुक्त जंगम
ऐसें ॥ गुरुपद पावले कैसे ॥ हे तूज सांगितलें अविनासे ॥ रूप माझें
ह्मणूनी ॥७०॥ माझेया सहित तो गुरु ॥ अवघा असे सदगुरु ॥ ऐसे
निश्चया आले साचारु ॥ परी तोही गुरुरूपा भजे ॥७१॥ येथें संपवून ४
ब्रह्म निरुपण ॥ पार्वती प्रती सांगे आपण ॥ जगन्माता अति आनंदून ॥
प्रश्न करी शिवासी ॥७२॥ त्या श्रवणा वीरशैवजन ॥ बैसले लावूनिया

ध्यान ॥ वक्ता मनीं सद्गदून ॥ श्रवण करवीं श्रोतीया ॥७३॥ इति श्री
परम रहस्य सारामृत ॥ टीका करूनिया प्राकृत ॥ कृत कृतार्थ मन्मथ ॥
चतुर्थाध्याय समाप्त ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

कल्पवरी ॥८०॥ देह कावलास कैवल्य दिलें ॥ जेणें स्व स्वरूपीं निमग्न केले ॥ जीवा शिव पदास बैसविलें ॥ गुरु मातेनें शेवका ॥८१॥ असे सगुणा निर्गुणातीत करून ॥ चारी मुक्तिंतून पैल तीरा नेऊन ॥ सिद्ध केले चैतन्यरूपीं आनंदून ॥ नीज बीज दाखविले ॥८२॥ ह्मणूनि परब्रह्मीं जो पावला ॥ त्यानें न विसरावें गुरुस्वामीला ॥ विसरे तो जाय आधोगतीला ॥ सत्यसत्य पार्वती ॥८३॥ यास्तव गुरु परते दैवत ॥ नाहीं नाहीं जाण त्रिभुवनांत ॥ मी तुज सांगितलें निभ्रांत ॥ भजा निश्चयें श्रीगुरुशी ॥८४॥ ईश्वरें गुरु महात्म निरोपिलें ॥ तेणें देवीचें मन संतोषलें ॥ पुढें श्रवणातें चित्त वेधलें ॥ परम रहस्य ऐकावया ॥८५॥ इतिश्री गुरु महात्म उत्तम ॥ गुरु पुत्राशीच कळेप्रेम ॥ इतरा नावडे निंदिती धर्म ॥ भवभ्रमीं पडतीसदां ॥८६॥ इतिश्री परम रहस्य सारामृत ॥ टीका करूनी प्राकृत ॥ कृत कृतार्थ किंकर मन्मथ ॥ पंचमो ध्याय संपविला ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥



६ ॥ श्लोक ॥ गुरोरेक दत्तलिंग एतद्दीक्षा विशेषतः ॥ प्रसादत्वा मोक्ष
वस्य सत्य मेवोच्यते मया ॥२२॥

टीका ॥ लिंग आणि दीक्षा देता ॥ एक गुरु विशेषता ॥ प्रसाद मोक्ष मंत्रार्था ॥ कुंटूंब गुरु एक असे ॥७४॥ एकगुरु एकलिंग एकप्रसाद तीर्थांग ॥ ह्मणून मोक्ष अभंग ॥ सत्य जाण पार्वती ॥७५॥

॥ श्लोक ॥ नभवंपति पत्निश्च गुरुद्वय वरानने ॥ गुरुद्वय भावद्वय नलभ्य मोक्ष वैभवं ॥२३॥

टीका ॥ पुरुष हा स्वस्त्रीयेचा गुरु ॥ ऐसा शास्त्राचा होय विचारु ॥ परी पति गुरु तो स्त्रीगुरु ॥ निरधारे जाणावा ॥७६॥ ह्मणून पती गुरुच्या वचनें ॥ सतीनें वर्तावेंच अनुदिनें ॥ नाहीं तरी दोनभावें वराननें ॥ मोक्ष नये हाताशी ॥७७॥ जरी स्त्री पुरुषा दोन विचार ॥ तरी तो जाणावा अनाचार ॥ एका विचारे वर्तता साचार ॥ यश कीर्ति वाढ- ६
तसे ॥७८॥ ह्मणून भेदभवा त्यागावें ॥ एका गुरु लिंगास भजावें ॥ तेणें गुरुकृपा ही स्वभावें ॥ प्राप्त होय अनयासे ॥७९॥ गुरुकृपा होता निःशंक ॥ तो गुरुरूप अवश्यक ॥ गुरु पदाचा गर्व देख ॥ आणिता नर्क

पत्नि श्रेष्ट ॥ अभेद भाव भोग वरिष्ट ॥ लिंगपूजा करी एकनिष्ट ॥ सदा संतुष्ट मानसीं ॥६६॥ त्या दोहीचं जें घडे भक्तिसुख ॥ तें सर्व भोक्ता होय मी एक ॥ गुरु शुश्रूषें मोक्षदेख ॥ उभय वर्गा प्राप्तपै ॥६७॥ पति पत्नि असती एक ॥ सव्यापसव्य अंगभूतिक ॥ पूर्वार्चित असे नैष्ठिक ॥ तरीच घडे सत्यहे ॥६८॥ सज्ञानी हे अमानिती ॥ गुरु अज्ञा अचरती ॥ तद्रुप होऊनि जाती ॥ मोक्षपंथा विश्वासें ॥६९॥ यालागी गुरु दोघा एक ॥ एका भावें होय निजसुख ॥ भेद खंडता मोक्षदायक ॥ गुरुमंत्र जाणावा ॥७०॥

॥ श्लोक ॥ स्वसा सहोदरश्चैव पुत्रसूता तथैवच ॥ पितृ माताच पितृव्यः इत्या चारेक निष्टकः ॥२१॥

टीका ॥ भागिणी बंधु कन्या पुत्र ॥ सदाचारें परम पवित्र ॥ तैसेच पिता आणि कलत्र ॥ एकाचारे वर्तावें ॥७१॥ आचार नेम असावा एक ॥ या करितां एक गुरुदेख ॥ गृहदासी माता शेवक ॥ एके मार्गें चालवावें ॥७२॥ एकधर्म एकमार्गें चालता ॥ सर्वेची गुरु अज्ञा पाळीता ॥ मोक्ष सुख चढेहाता ॥ सत्य जाण देवींपै ॥७३॥

कीजे सत्य कैलासी ॥५९॥

५ ॥ श्लोक ॥ शिक्षाचार पतिपत्नि गुरुरेको भवेत्खलुः ॥ भाषितंच
वीरशैवे रतिसंग वराननें ॥१९॥

टीका ॥ स्त्री पुरुषास आचार गुरु ॥ एकची असावा निर्धारु तरीच होय भवपारु ॥ उभय शिक्षा एकची ॥६०॥ भिन्न गुरु असतां जाण ॥ भिन्न आचारें वर्तमन ॥ तेथें स्त्री पुरुषा सौजन्य ॥ कदांकाळीं असेना ॥६१॥ दोनभाव दोनभक्ति ॥ भिन्नाचारें उत्पन्न होती ॥ परधर्मी तया निंदिती ॥ एकी नसे ह्मणूनिया ॥६२॥

॥ श्लोक ॥ पतिरेव गुरु स्त्रीणां परानुग्रह नैवच ॥ पतिव्रत्त रतायाश्च
धर्मपत्नि तयोवदेत् ॥२०॥

टीका ॥ स्त्रीयाला पतीच गुरु ॥ असें वदें शास्त्राच्यारु ॥ पति
आज्ञा नमस्कारु ॥ सद्गदुनी करावा ॥६३॥ पति आज्ञा पाळीता सत्य ॥ ५
जगमान्य होय तत्कृत्ये ॥ क्रियाचारें न वर्तता दैत्य ॥ क्रोधाविष्ट पै होती ॥६४॥ क्रियाचाराचे ठायीं रती ॥ असावीं जाण स्त्रीयाप्रती ॥ जेणें अंगें संतुष्टेंपति ॥ तीच सती जगीं होय ॥६५॥ लिंगांगीची स्व-

पशुपति ॥ सगुणरूपें गुरुमूर्ति ॥ जन्मा खुंटवूनि या मुक्ति ॥ पशु-
पाश छेदितसे ॥५०॥ जन्मा येण्याचीं कारणें अनेक ॥ परी पापपुण्य
समानची देख ॥ त्या वांचून हें नरदेह सुख ॥ मिळणेच नाहीं जाण-
पा ॥५१॥ जरी नरदेह पावला उत्तम ॥ तरी पुढें चौऱ्याअशीचा नेम ॥
ठेविला करून प्रचंड यम ॥ शिक्षा द्यावया प्राण्यासी ॥५२॥ त्याचे हेर
चित्र गुप्त ॥ भूमंडळीं असती अलिप्त ॥ ज्या ज्या कर्मे प्राणी होती
तृप्त ॥ तें तें वरीष्ट लिहितात ॥५३॥ अंतीं तया तेच नेती ॥ पाप पु-
ण्याचा झाडा घेती ॥ निर्दय शिक्षा अधोगती ॥ प्राणी भोगींती यात-
ना ॥५४॥ परी जे माझे पूर्णभक्त ॥ तयापुढें यम राबत ॥ त्याचे सांगो-
पांग शिवदूत ॥ अंतिं नेती कैलासीं ॥५५॥ माझे दुताची बरोबरी ॥
दुजा देव कोणी नकरी ॥ ममाज्ञा उलंघिता थोरी ॥ न पावे ब्रह्मादि-
क ॥५६॥ भस्म रुद्राक्षांकित देह ॥ यमदूते ने लवलाहे ॥ तयाचे शीर
छेदू पाहे ॥ वीरभद्र साक्षपै ॥५७॥ जो प्राणी माझा अंकिला ॥ त्या
नपाहे यमडोळां ॥ अज्ञा असे सर्वकाळा ॥ शिवभक्ता वंदावें ॥५८॥
शिवाचाराचे नियोगे ॥ जे चालती अनुरागे ॥ तया मोक्षाचेय जागे ॥

टीका ॥ प्राण लिंगीं ऐक्य करूनी ॥ लिंगची प्राणासम मानी ॥ असें अभ्यासून वर्ते जनीं ॥ तोची वीरशैव जाणावा ॥४४॥ त्यानें केला देह त्याग ॥ तो जाणावा महा याग ॥ प्राण राहे लिंगीं सांग ॥ ह्मणूनी दग्ध करूंनये ॥४५॥

॥ श्लोक ॥ दग्धस्य दहनं नास्ति पाकस्य पचनं तथा ॥ शिवाग्नि दग्ध देहस्य न दहनोदकं क्रिया ॥१७॥

टीका ॥ जैसें सिद्ध अन्ना भितरीं ॥ पुन्हां पचवितां निर्धारीं ॥ विष तुल्य होय सत्वरी ॥ प्राण हरण करावया ॥४६॥ तयाचे परी लिंगधारी ॥ दहन करितां दोष भारी ॥ प्राणहत्या घडे एकसरी ॥ दहन न करी यास्तव ॥४७॥ जे शिवाग्निनें दग्ध झालें त्याचें दहन कदां काळें करूंनये हिमनग बाळे ॥ उदक क्रिया वर्जावी ॥४८॥

॥ श्लोक ॥ वराननें गुरुस्तत्वं पशूनां पतिरित्यपि ॥ पशुः पाशेन निर्मुक्तो गुरु भावं निरीक्षणं ॥१८॥

टीका ॥ शंकर ह्मणे पार्वती प्रती ॥ ब्रह्मतत्व असे गुरु स्फूर्ति ॥ सर्वेची जाणावा पशुपति ॥ ऐक्यरूपीं सदा असे ॥४८॥ मीच असे

४

चर ॥ हे दोन लिंगाचे प्रकार ॥ दोन्ही रूपीं मीच ईश्वर ॥ परी गुरु चरलिंग जाणावें ॥३७॥ गुरुशीं ध्याता अर्चिता जाण ॥ कोट लिंगाचें घडें पूजन ॥ अर्बुद पात्रीं भोजन दान ॥ घडतसे अनयासे ॥३८॥

॥ श्लोक ॥ यो गुरु मृत्य भावेन रुदंती तयो नरः ॥ गुरु लिंग प्र-
सादंच नास्ति नास्ति वरानने ॥१५॥

टीका ॥ गुरु मृत्यु पावला ऐसे ॥ भावून रुदन करितसे ॥ तो नर अज्ञानच असे ॥ गुरु महात्म न जाणे तो ॥३९॥ चरगुरु चिरंजीव ॥ न मानी कदां मानव ॥ तया प्रसाद वैभव ॥ नाहीं नाहीं पार्वती ॥४०॥ गुरु असे निराकार ॥ हें कथीलें वारंवार ॥ यास्तव तो ब्रह्माकार ॥ ब्रह्म वस्तु जाणीजे ॥४१॥ गुरु ब्रह्म असें नेणोनी ॥ भक्ति करी भावें जनीं ॥ मृत्यु पावला हें मनीं ॥ आणी तो चांडाळ जाणावा ॥४२॥ गुरुरूप सभरा भरीत ॥ त्याचा न लागे मानवा अंत ॥ अदृश्य अगोचर अतित ॥ असे जाण सर्वा ठायीं ॥४३॥

॥ श्लोक ॥ प्राण लिंगंच संयुक्तं लिंगंच प्राण संयुतः ॥ प्राणान्
त्यक्ता कालेच तद्देह दग्ध वर्जतु ॥१६॥

हो ॥३०॥ यास्तव तीन रूपा माझारीं ॥ माझा वास सदां सुंदरीं ॥
दुजें अन्य स्थाना भितरीं ॥ मी अजाग्रत असे ॥३१॥ लिंगरूपीं जो
३ सद्गुरु ॥ वाहे धर्माचा हंकारु ॥ तोची वीरशैवाचारू ॥ उद्धारू जगा-
मार्जी ॥३२॥ जैशी भक्ति गुरु जनीं ॥ तैशीच असावी जंगम चरणीं ॥
दोन्ही रूपा सन्मानूनी ॥ लिंगरूप भाविजे ॥३३॥

॥ श्लोक ॥ गुरु देवं महादेव मेक भावेन भावयेत् ॥ भावद्वय वि-
भागेन नरके वास मक्षयं ॥१३॥

टीका ॥ गुरु आणि महादेव ॥ समान असे वैभव ॥ त्यांचे ठायीं
दुजा भाव ॥ मानिता नरक कल्पवरीं ॥३४॥ स्वगुरु आणि महादेव ॥
उभयीं नसे भेद भाव ॥ ह्मणूनी असे श्रेष्ठ प्रभव ॥ गुरुपूजीं ठेवि-
ला ॥३५॥

॥ श्लोक ॥ गुरुरूपाद्भवे ल्लिंगः लिंगरूपाद्भवेद्गुरुः ॥ स्थावरं जंगमं-
चैव चरलिंगो गुरुस्मृतः ॥१४॥ ३

टीका ॥ गुरुपासून लिंग प्राप्ती ॥ लिंगाकडून गुरु तृप्ती ॥ उभया
ठायीं शिव व्याप्ती ॥ असे जाण पार्वती ॥३६॥ स्थावर आणि दुजे

झाला ॥ मानव न ह्मणावें तयाला ॥ परब्रह्मची जाणावें ॥२४

॥ श्लोक ॥ यो गुरुकाया कृपेनं गुरुभावं न व्यक्ततां ॥ शिष्यज्ञान प्रदीपेन सप्रमाण पश्यत्यादि ॥११॥

टीका ॥ हे गुरु देहधारी न ह्मणावें ॥ ब्रह्म अगोचर तया जाणावें ॥ तरीच परब्रह्म पावावें ॥ येणें भावें करूनि ॥२५॥ सद्गुरु अव्यक्त असती ॥ व्यक्तशिष्या उपदेशतीं ॥ प्रदीप ऐशी ज्ञान ज्योती ॥ दाखवीति पूर्णब्रह्म ॥२६॥ तेव्हां तेही होती गुरुरूप ॥ घेती ब्रह्मानंदीं झोप ॥ शिष्य गुरुत्वाचा अक्षेप ॥ न उरे कदां तेथें ॥२७॥ गुरु शिष्या न दिसे भेद ॥ ध्यान योगें असे अभेद ॥ गुरु कृपें होय सद्बुद ॥ तो सत्शिष्य जाणावा ॥२८॥

॥ श्लोक ॥ एकमूर्ति त्रयोर्भागं गुरु लिंगतु जंगमः ॥ जंगमंच गुरुलिंगः त्रिविध लिंग मुच्यते ॥१२॥

टीका ॥ एका मुर्तिचे आवतार ॥ तीन असती पै साचार ॥ ह्मणूनिया गुरु सत्वर ॥ लिंगरूप जाणावा ॥२९॥ लिंग तोची होय जंगम ॥ जंगमची गुरु उत्तम ॥ गुरुरूप तें शिवासम ॥ शास्त्रांतरीं वर्णिलें

विकार ॥ लोह परिसा सम ॥१६॥ पातळ घृत तेचि गोटलें ॥ तरी
घृतपणातें नटळें ॥ तैसे निराकार गुरुत्व आकारलें ॥ लिंगरूपे करू-
२ नियां ॥१७॥ कर्पूर आकार दिसेजरी ॥ परी तो नराहे उदका बाहेरी ॥
उष्णता स्पर्शता वरचेवरी ॥ विरून जाय सर्वथा ॥१८॥ मागे राहे तो
परिमळ ॥ पाहतां अदृश्य केवळ ॥ तैसे गुरुलिंग अमळ ॥ आकारा आलें
असें ॥१९॥

॥ श्लोक ॥ गुरुरूपतुं योविद्वान् शिवरूपमितिस्मरन् ॥ स्वशरीरात्म
संबंधो गुरुः शिष्याननुग्रहेन् ॥१०॥

टीका ॥ ज्ञानीयास गुरु हाच शिव ॥ आणि शिव तोची गुरु देव ॥
उभय निर्गुण सावेव ॥ भक्तालागीं आवतरती ॥२०॥ लिंगरूपीं जो परपु-
रुष ॥ जो नकळेंची वेद श्रुतीस ॥ तया न ह्मणावें आकारास ॥ निर्गु-
णाचि जाणावें ॥२१॥ गुरु ही आहे तयेपरी ॥ देवाहून अधिक थोरी ॥
वर्णीता शिणले वेदचारी ॥ अगम्य रूपा अगोचरा ॥२२॥ पूजा पत्री २
भावें भक्ति ॥ कैसी अर्चा निराकाराप्रती ॥ ह्मणूनी सत्य गुरुमूर्ति ॥ शिव-
रूपीं अवतरले ॥२३॥ निराकारतोची आकारला ॥ जडजीवा गुरुरूप

॥ श्लोक ॥ अंगुष्टाग्रे अष्टशत तीर्थान्यापि वसंतिहि ॥ सागरा स्सप्त सर्वेपि तद्गाग्रे कुल पर्वतं ॥६॥ नक्षत्र ग्रह रुद्राद्या तस्य गुल्फे वरानने ॥ जंघयो वसते नित्यं षट्त्रिंश तत्व मूलकैः॥७॥

टीका ॥ जयाचें चरण कमलीं ॥ अष्टोत्तर तीर्थें निमालीं ॥ जग तारावया शक्य झाली ॥ सर्व दोषा पासूनि ॥१२॥ महातीर्थे सप्तसागर ॥ तेही वसती चरणींस्थिर ॥ महापर्वत धुरंधर ॥ गुरुपदीं नांदतसे ॥१३॥ गुल्फें द्वयें नवग्रह ॥ जंघे मूळ तत्वासह ॥ छत्तीस तत्वांचा समूह ॥ नृत्यगति दाविती ॥१४॥

॥ श्लोक ॥ सप्तसागर पर्यंतं तीर्थस्नान फलंयथा ॥ गुरुरंघ्री जलंबिंदु सहस्त्रांशेन दुर्लभः ॥८॥

टीका ॥ सप्तसागर तीर्थाचें जें फल ॥ तया सहस्त्रांशें पादोदकजल ॥ अधीक ह्मणे जाश्वनीळ ॥ दुर्लभ वस्तु असेपै ॥१५॥

॥ श्लोक ॥ अशरीरं गुरुर्भावं आकारं लिंग मूर्तिकं ॥ अंगसंग समास्यातं गुरुलिंग समंश्रुतं ॥९॥

टीका ॥ गुरुमूर्ति निराकार ॥ लिंगमूर्ति तो आकार ॥ संयोगें पावें

३

टीका ॥ यास्तव माझा गुरुनाथ ॥ तो जगाचा सद्गुरु होत ॥ मी असें सर्व भूताव्याप्त ॥ ह्मणूनि गुरुसी वंदावें ॥६॥

॥ श्लोक ॥ पार्वत्युवाच ॥ केन मूलं ध्यानं चैव केन मूलं पूज्यार्चितं ॥
केन मूलं तथा मंत्रं मुक्ति मूलं केन ब्रुवी ॥४॥

टीका ॥ पार्वती ह्मणे शंकराशी ॥ योग्य कोण असे ध्यानासी ॥ तैसेच मूळ पूजेशी ॥ मुक्तीसी मूल कोणपै ॥७॥ ईश्वरोवाच ॥

॥ श्लोक ॥ ध्यान मूलं गुरोर्मूर्तिः पूजा मूलं गुरोःपदं ॥ मंत्र मूलं
गुरोर्वाक्यं मोक्ष मूलं गुरुःकृपा ॥५॥

टीका ॥ शंकर ह्मणे पार्वती प्रती ॥ ध्यानास योग्य गुरुमूर्ति ॥ तयाचें चरण सद्भावें पूजिती ॥ अन्य पूजा निरर्थक ॥८॥ गुरु असें मंत्रास मूळ ॥ गुरु वाचून मंत्र निर्फळ ॥ गुरु वाक्याचा सांभाळ ॥ तरीच होय गुरुकृपा ॥९॥ गुरुकृपेवीण मुक्ति नाहीं ॥ वेदगर्जे उर्ध्व वाही ॥ मुक्तिदाता गुरु पाहीं ॥ ममरूप जाणीजे ॥१०॥ देवा मार्जी मीच ईश्वर ॥ मृत्यु लोकीं वरि माहेश्वर ॥ क्रीयाचाराशी आधार ॥ सत्य जाणहो देवी ॥११॥ ३

श्रीमृत्युंजयाय नमः ॥ श्लोक ॥ गुरुमाता गुरुपिता हितकृते तियो-
गुरुः ॥ गुरुदेव परंनास्ति तस्मै श्रीगुरुवे नमः ॥१॥

टीका ॥ शिव ह्मणे हो वरानने ॥ जो गुरु वांचून कांहीं नेणे ॥ सर्व-
स्वे गुरु उपासने ॥ अनन्य भावें शरण ॥१॥ गुरु तोची मातापिता
स्वहितोक्त ज्ञानदाता ॥ परमदयाळू तत्वता ॥ श्रेष्ठ असे देवाहुनी ॥२॥
आप्त सोयरा लिंगांगीचा ॥ गुरुची असें पूर्वजाचा ॥ जो पर शिवकरी
जीवाचा ॥ तया गुरुसी नमावें ॥३॥

॥ श्लोक ॥ न गुरु रधिक शिवः न गुरोरधिकहरिः ॥ शिवःकोपो
गुरु त्राता गुरु कोपोन कश्चनः ॥२॥

टीका ॥ गुरुहुनी शिवाची नाहीं थोरी ॥ व्यापक विष्णु जाण तया-
परी ॥ उभय कोपा गुरुतारी ॥ गुरुकोप नशमे कोणा ॥४॥ हरिहर
विश्वगुरु अंकित ॥ ते गुरुध्यान अखंड करित ॥ कळीकाळ नम्र पाया
लागत ॥ ऐसे गुरु महात्म जाणिजे ॥५॥

॥ श्लोक ॥ मन्नाथः श्री जगन्नाथो मद्गुरु स्त्रिजगद्गुरुः ॥ ममात्मा
सर्व भूतात्मा तस्मै श्रीगुरुवेनमः ॥३॥

श्रीपरब्रह्म निर्गुण स्वरूपाय नमः ॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ कथं प्रकृति कायश्च ज्ञानकाया कथंभवेत् ॥ भेदंचाकिं द्वयोजाते किं बीजं कथय स्वमे ॥१॥

टीका ॥ गिरिजा प्रश्नकरी शंभुशी ॥ प्रकृति काया ती कैसी ॥ ज्ञान कायेचे नेमाशी ॥ सांगा स्वामी साक्षपे ॥१॥ दोन्ही कायेचे सविस्तर ॥ मज सांगावें भेदाकार ॥ बीजाक्षराचाही विचार ॥ प्रगट कीजे मजलागीं ॥२॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ महंत मन्यते येन यः श्रोत्रे यस्य सद्गुरुः ॥ तथा ब्रूबीज मव्यक्तं ज्ञानांगस्य प्रगल्भतां ॥२॥

टीका ॥ ईश्वर ह्मणें आंबेप्रती ॥ तुझे प्रश्न गहन असती ॥ परी अज्ञान जनांचें चित्तीं ॥ प्रेमभाव प्रगटेल ॥३॥ मोठ्या श्रमें करून जाण ॥ गुरुनें सांगितलें ज्ञान ॥ तें स्वभावें अनुभवून ॥ सत्शिष्या आनंदपावें ॥४॥ तरीच गुरुमंत्र बीज ॥ तयाचे कर्णीं राहे सहज ॥ धर्म नीतीचें उदकें काजें ॥ होती अंकुर बीजातें ॥५॥ बीज विरुढतां कर्णीं ॥ पातकाची होय हानी ॥ अव्यक्त ज्ञान मुरूनि ॥ ज्ञानांगें दृढ होय ॥६॥

१ ॥ श्लोक ॥ शिव मंत्राक्षरं बीजं गुरुरात्मा समाहितं ॥ तत्प्राण ज्ञान कायस्य प्रकृतिप्रती बिंबवत् ॥३॥

टीका ॥ शिवमंत्र बीजाक्षर बरवें ॥ तें उपदेशीलें श्रीगुरुदेवें ॥ शुद्ध काया ह्मणती सद्भावें ॥ मंत्र बिंबापाहुनी ॥७॥ सद्गुरुचे बीजाक्षर ॥ बिंबता झालें ब्रह्माकार ॥ प्रपंचाचा होय संव्हार ॥ ज्ञान काया ह्मणती त्या ॥८॥ जो गुरु उपदेशे करून ॥अंतर बाह्य गुरुची आपण ॥ प्रकृति काया त्यजून ॥ ज्ञान काया प्राप्त झाला ॥९॥ जैसे महाअरण्य सघन ॥ नाना वृक्ष वेष्टित उद्यान ॥ तें शुद्धकीजे सर्व छेदून ॥ क्षेत्रालागीं कृषीकें ॥१०॥ तैसे प्रकृति कायावन ॥ षड् विकार हे वृक्षजाण ॥ अनुताप कुटारें करून ॥ छेदूनिया टाकिलें ॥११॥ बुद्धि कुदळीनें खणून ॥ काम क्रोध महा दुर्जन ॥ टाकिले नाहींसें करून ॥ ज्ञान नांगर धरीयला ॥१२॥ ही जाणीजे शुद्धकाया ॥ न करी कर्मेंद्रियाची दया ॥ सदा शुद्धभावें गुरु-राया ॥ शरण असे वरीष्ठ ॥१३॥ जया शुद्ध कायें भितरीं ॥ गुरु कृपेनें बी- १
जाक्षरी ॥ मंत्र संपादण्याची थोरी ॥ देवादिका दुर्लभ ॥१४॥ मंत्र साध्य झाल्याविणे ॥ ज्ञानकाया नोव्हेजाण ॥ मंत्रामाजी पंचानन ॥ शिवमंत्र

असेपै ॥१५॥

॥ श्लोक ॥ प्रकृति ज्ञान कायश्च ॥ द्वंद्वभेद समन्वितं ॥ एतद्गुणेन भावेन ज्ञानकाया स्तथा भवेत् ॥४॥

टीका ॥ प्रकृती काया ज्ञान कायेशी भिन्न ॥ जैसे पात्रीं वाढीलें अ पक्वान्न ॥ क्षुधाक्रांत भक्षीता पावें खिन्न ॥ तैशी जाण प्रकृती काया ॥१६॥ तेंच पक्वान्न पात्रीं वाढीतां ॥ जैशी तृप्ति होय तत्वता ॥ तेवीं ज्ञान कायेची वार्ता ॥ समाधान पावतसे ॥१७॥ हें गुरु मंत्राचें सामर्थे ॥ ज्ञान कायें नटला स्वार्थें ॥ परी ओळख यथार्थे ॥ तत्स्वरूपीं ठेवीका ॥१८॥

॥ श्लोक ॥ दिवारात्रौ नचज्ञानं न कालश्चापि कल्पितं ॥ न प्रसूता यथाज्ञानं दर्पण प्रति बिंबवत् ॥५॥

टीका ॥ जैसा दिन प्रकाशवंत ॥ रात्रीचा तेथें नलगेअंत ॥ कींकाल पातला अकल्पित ॥ नभीत तयाप्रती ॥१९॥ षडउर्मी षड्विकार ॥ नसे जेथें द्वेष मत्सर ॥ निर्लोभ निरहंकार ॥ ती ज्ञान काया बोलिजे ॥२०॥ आशा मनिशा तृष्णा ॥ नसें भिन्न भेद भावना ॥ अभेद भावें तेथें

२

कल्पना ॥ तीच ज्ञान काया बोलिजे ॥२१॥ समाधान सदा शांत ॥ जो सदय कृपावंत ॥ सर्वभूतीं समपाहत ॥ ज्ञान काया बोलिजे ॥२२॥ काम क्रोधादिकांचे वर्ग ॥ करून टाकिले दीनस्वर्ग ॥ नाहीं मी तूं पणाचा संसर्ग ॥ विवेकें सर्व आकळीलें ॥२३॥ समाधानीं सदाशांत ॥ लाभ हानी अमानीत ॥ दुजाचें दुःख हरित ॥ ती ज्ञानकाया ह्मणावी ॥२४॥ प्रकृती काया अज्ञान एक ॥ जेथें स्वरूपाची विस्मृति देख ॥ अहंकृती अज्ञान अवश्यक ॥ वसेसदा ज्या देहीं ॥२५॥ तीस ह्मणती अज्ञानकाया ॥ नायके नपाहे विवेकीया ॥ कुतर्कभास मनीं धरूनिया ॥ वसेसदा गर्व भरीत ॥२६॥ ऐशी प्रकृती ज्ञान संपदा ॥ ही तुज निरोपिली संवादा ॥ गौरी तुही असावेंसदा ॥ ज्ञानकाया होऊनी ॥२७॥

॥ श्लोक ॥ भाले भस्म त्रिपुंड्रश्च कंठे रुद्राक्ष मालिका ॥ वक्त्रे षडाक्षरं मंत्रं सरुद्रो नात्र संशयः ॥६॥

टीका ॥ असे जे ज्ञानकायें सुसिद्ध ॥ मस्तकीं शोभे त्रिपुंड्रशुद्ध ॥ २
रुद्राक्ष अभरण विविध ॥ ज्ञानकायें शोभवीं ॥२८॥ मुखामाजीं महामंत्र ॥ सदा उच्चारी पवित्र ॥ तैसीच लिंगपुजा अहोरात्र ॥ नित्यनेमें

करितसे ॥२९॥ मंत्रावांचून पूजा निर्फळ ॥ मुग्धपणें नसावी तळमळ ॥ अमंत्रें शोभें ज्याश्वनीळ ॥ ह्मणून समंत्र पूजीका ॥३०॥ देव्युवाच ॥

॥ श्लोक ॥ केन मंत्रेण त्वत्पूजा किंकाले वर्ततेप्रभुः ॥ किंमंत्रेण जपः सिद्धिः यतत्सर्व कथंभवेत् ॥७॥

टीका ॥ कोणत्या मंत्रे करावी पूजा ॥ ऐसे विचारीतसे गिरिजा ॥ कोण मंत्र जप सिद्धिबीजा ॥ नंदीध्वजा सर्वसांगा ॥३१॥ महामंत्र सप्तकोटी ॥ असतीजाण धुर्जटी ॥ तुह्मी कथीले परमेष्टि ॥ ते श्रवण मजझाले ॥३२॥

॥श्लोक ॥ ईश्वरोवाच शुचिर्भूतेन मंत्राढ्य तत्रार्घ्यं पाद्यादि योजेत् ॥ ध्यानावाहन भावेन पूजये ममईश्वरी ॥८॥

टीका ॥ शुद्धस्नान करूनी जाण ॥ महामंत्रें करावें ध्यान ॥ अर्घ्यें पाद्यें पात्रें करून ॥ आरंभावें संकल्पा ॥३३॥ नित्य संकल्प होतापूर्ण ॥ मग करावें माझें ध्यान ॥ ध्याना सरसे अवाहानून ॥ शुभ्रासनें बैसवावें ॥३४॥ मग अर्घ्यपाद्यें होता मान्य ॥ करवावें शुद्धोदक स्नान ॥ वस्त्रालंकारें गौरवून ॥ परिमळ धूपा अर्पावें ॥३५॥ पात्रीं नैवेद्य षड्रस-

अन्न ॥ समर्पावें भावें करून ॥ एकारती दीपा ओवाळून ॥ ध्यान स्व-
रूपीं लावावें ॥३६॥ ही पूजा कर कमळीं ॥ करितसे वीरमंडळी ॥ पूजा
होता पुष्पांजळी ॥ वेदमंत्रे करितसे ॥ ३७॥ महामंत्र षडाक्षरी ॥ जपा-
लागीं झडकरी ॥ एकाग्रतेचियापरी ॥ वैखरीनें उच्चारी ॥३८॥ हा मंत्र
ऐकता कर्णीं ॥ मी सदा होतसे ऋणी ॥ जी इच्छा जापकाचे मनीं ॥ ती
आनंदे पुरवीतसे ॥३९॥ पंचाक्षरी महा मंत्राची थोरी ॥ वर्णिता न वर्णवें
निर्धारी ॥ सप्तकोटी मंत्राचा पुढारी ॥ उद्धारक जगतांचा ॥४०॥

॥ श्लोक ॥ बीज द्विविध रूपस्य मंत्रन्यास वरानने ॥ एको दीर्घस्तु
त्वत्कुर्यात् पंचमं शक्ति माश्रये ॥१०॥

टीका मंत्रबीज दोनरूपीं ॥ न्यासबीज विघ्नेंथोपीं ॥ न्हस्व दीर्घ उच्चार
अर्पि ॥ पंचमशक्ति कारणें ॥४१॥ तया बीजाचेंरूप द्विविध ॥ षडाक्षरी
पंचाक्षरी प्रसिद्ध ॥ उभया एका प्रणवाचा भेद ॥ उत्पत्तीस कारण
तोची ॥४२ जेंकारापासून सर्ववर्ण ॥ उत्पन्न झाले सर्वे छपन्न ॥ तया
छत्तीस मुख्यजाण ॥ तयाचे दशद्वय भेद ॥४३॥ जेंकारापासून अक्ष-
राची हारी ॥ तयामाजीं निवडीला पंचाक्षरी ॥ निर्णय निरुपू अवधारी ॥

ऐके चित्त देऊनिया ॥४४॥

॥ श्लोक ॥ अक्षरं आदितंवर्ग त, प वर्ग शुभानने ॥ य, वर्गे तत्रयश्चैव प्रणवादि प्रशस्यते ॥१०॥

टीका ॥ त वर्गाचा अंत नकार ॥ तैसा प वर्गाचा मकार ॥ यकार वर्गाचा शकार ॥ इ स्वरानें अंकिला ॥४५॥ तेवी य वर्गाचा उपांत्य ॥ आकरादेशें वर्तेसत्य ॥ आणि सहावें वर्गाचा प्रथमांत ॥ सार निवडीला असे ॥४६॥ नमःशिवाय पंचाक्षरें गोमटीं ॥ हीं निपजलीं बीजाकाराचें पोटीं ॥ प्रगट केलीं भक्ति सुखासाठीं ॥ वीरशैवा कारणें ॥४७॥

॥ श्लोक ॥ यतत्पंच स्वरोपेतां मंत्रपंचाक्षरी स्मृतं ॥ प्रणवेन समायुक्तं षडाक्षर मित्योच्यते ॥११॥

टीका ॥ मागे सांगीतला पंचाक्षरी ॥ तोची प्रणवासह षडाक्षरी ॥ द्विविधवर्ते निर्धारी ॥ जाणदेवी सुखानंदे ॥४८॥

॥ श्लोक ॥ तव प्रणम्य कुर्वंती मव्ययं प्रणमंतथा ॥ द्विबंले शिव मंत्राणां शक्तिभूतं न संशयः ॥१२॥

टीका ॥ तुजला नमन करून ॥ माझेठायीं नम्र होऊन ॥ मंत्र

उच्चारीता जाण ॥ शक्ति अपार मंत्रांगीं ॥४९॥ तो मंत्र सतेजमूर्ति ॥
ऐसें वदे वेद श्रुतिः॥ ॐकार रूपाची स्फूर्ति ॥ वंद्य जाण देवादिकां ॥५०॥
ह्याचा भेद नकळे कोणा ॥ महत्व जाणे मुमुक्षजना ॥ दुर्लभ असे अ-
ज्ञाना ॥ जंगमरूपीं ज्ञान असे ॥५१॥ षडाक्षरीची उत्पत्ती स्वमुखी ॥
षडमुखेंकर्णि ऐकतां निकी ॥ जपकरीतसें स्वसुखी ॥ लिंगभक्तिप्रीतीनें ॥५२
एवंलिंग पुजेका वांचून ॥ नहोय षडाक्षरी साधन ॥ गुरुमुखें करूनी
गृहण ॥ जपसिद्धी उत्तमोत्तम ॥५३॥

॥ श्लोक ॥ षडाक्षर समख्यातं षडानन समन्वितं ॥ षडभेद न जा-
णाति ॥ तत्पूजा निष्फलं भवेत् ॥१३॥

टीका ॥ षडाक्षरी सारखा मंत्र नाहीं ॥ कार्तिक स्वामी ज़पत राही ॥
षडभेद जाणा लवलाही ॥ पूजा कीजे एकाग्रे ॥५४॥

॥ श्लोक ॥ षडाक्षराणि कर्मसां षडाधारस्य बीजकं ॥ चक्रे बीजाक्षरं
जप्त्वा दुर्लभं श्रुणु पार्वति ॥१४॥

टीका ॥ ही सहा अक्षरें षट् चक्रासी ॥ अधार असें सर्व कर्मांशी
तया वाचून गती चक्राशी ॥ कदांकाळीं असेना ॥५५॥ कोणेचक्रीं

कोणाक्षर ॥ हा मुख्य योग विचार ॥ तो जाणें करी संसार ॥ ऐसा प्राणी दुर्लभ ॥५६॥ ज्याणें देहीं षडचक्रें भेदिलीं ॥ तेणें ब्रह्मांडें विलोकिलीं ॥ कैशी वर्णाक्षरें उद्भवलीं ॥ ऐकगिरिजे सत्वर ॥५७॥

॥ श्लोक ॥ एकैकाक्षरेषुपंच क्षराक्षर प्रवर्तंते ॥ तद्गुह्यं परमंज्ञानं गुरुविना न लभ्यते ॥१५॥

टीका ॥ एकएक अक्षराचे ठायीं ॥ पांचपांच निर्मिलीं अव्ययीं ॥ संव्हार कालीं पावतीं लयीं ॥ पंचाक्षरीं सर्ववर्ण ॥५८॥ तीं पंचाक्षरें परस्पर ॥ पावन करितीं चराचर ॥ अंति प्रसवति अपार ॥ लिप्त असतीं ओंकारीं ॥५९॥ देव्युवाच ॥

॥ श्लोक ॥ केणचक्रे केणवर्णः व्यापितंच परात्परः ॥ तत्सर्वं श्रुतु मिछामी प्रणवादी प्रसिदती ॥१६॥

टीका ॥ पार्वती ह्मणे शिवाप्रती ॥ कोण्या चक्रीं वर्णकिती ॥ षडदलीं व्यापून असती ॥ परपुरुषा सांगामज ॥६०॥ षड चक्रामाजीं मुख्य बीज ॥ निवडूनि सांगावें जी मज ॥ तरीच होय हें भवकाज ॥ अपराधीं जीवाचें ॥६१॥ ईश्वरोवाच ॥

॥ श्लोक ॥ आधारस्य नकारंच स्वाधिष्ठानें मकारकं ॥ शिकारं मणि-
पूरेच वकारं अनुहातके ॥१७॥ यकारं स्याद्वि शुद्धस्य ओंकारंचललाटके ॥ एवं बीजाक्षरं देवी ज्ञानकाया इदंश्रुणु ॥१८॥

टीका ॥ अधारस्थाना माझारीं ॥ चतुर दलकमला भितरीं ॥ नकार बीज वस्ती करी ॥ आपान शक्ति बोलिजे ॥६२॥ स्वाधिष्ठान तें असें उत्तम ॥ कमलीं दलें असतीं षष्टम ॥ मकार हें बीज सर्वोत्तम ॥ ठेवितसे तयें स्थानीं ॥६३॥ मणी पूरिची ऐका मौज ॥ दश दलावरी पेरीलें बीज ॥ शिकार रूपीं वर्ते सहज ॥ समान वायु तेथींचा ॥६४॥ अनुहात तें हृदय जाण ॥ जेथें वकारचें अधिष्टान ॥ द्वादश दलीं अंगुष्ट प्रमाण ॥ प्राणवायु वसतसे ॥६५॥ विशुद्ध हेंची ताल मूल ॥ जेथें कमलीं शोडशदल ॥ यकार बीज हें अमल ॥ उदानें संरक्षीलें ॥६६॥ अग्निस्थान तेंचीं ललाट ॥ द्विदला शोभे गोल्हाट ॥ ओंकार मूळ औठपीठ ॥ चंद्र प्रभा सहस्त्रपरी ॥६७॥ तेथें कोट सुर्याची प्रभा ॥ परमहंस शिवउभा ॥ सहस्त्रावधि देवसभा ॥ तोषविती तयाप्रती ॥६८॥ किन्नर गंधर्व एक्षजाण ॥ लज्जीत होती तया देखून ॥ अप्सरा नारद तुंबरगण ॥ स्तब्ध मौनीं

निचिष्ट ॥६९॥ ऐसा ऐकतां पहातां डोळां ॥ परम कळवळे हिमनग-
बाळा ॥ हं क्षं तत्वाचा सोहळा ॥ गर्जे घोष अहं सोहं ॥७०॥ देव्युवाच ॥
॥ श्लोक ॥ यथालिंग स्स्थलंचैव तथालिंग कलाभयं ॥ किंभेदंच स्थितौ
यस्य कारुण्यंचवद प्रभो ॥१९॥

टीका ॥ ही जी लिंग स्थलाची रहाटी ॥ मज सांगाजी उठाउठी ॥
लिंग कला ज्ञान गोमटी ॥ अभेद दृष्टि श्रुतकरी ॥७१॥ परम रहस्य
ग्रंथानुवादे ॥ उमा महेश्वर संवादे ॥ षडाक्षरी पंचाक्षरीं द्विभेदे ॥ वर्णिलें
ज्ञान भावीका ॥७२॥ इतिश्री परम रहस्य साराम्रुत ॥ टीका करूनी
प्राकृत ॥ कृतकृतार्थ किंकर मन्मथ ॥ षष्टमोध्याय संपूर्ण हा

॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥



षड्लिंग ह्मणसी कोण ॥ आचारलिंग गुरुलिंग जाण ॥ शिवलिंग जं-
गमा भजन ॥ प्रसादलिंग महालिंग ॥६५॥ या सहा लिंगा जाणून ॥
जो करी शिव पूजन ॥ तोची भक्त जंगम जाण ॥ वीरशैव बोलिजे
त्या ॥६६॥ जें लिंगनिष्ठ आचार संपन्न ॥ तेची वीरशैव शिवगण ॥
जीव शिवाची जाणती खूण ॥ इष्ट, भाव प्राण लिंगीं ॥६७॥ हें भेद न
जाणतां करी पूजा ॥ त्यास विन्मुख शिवराजा ॥ मोक्ष मार्गाचिये
काजा ॥ दुरावती जाण ते ॥६८॥ ऐसें रहस्य हें सुंदर ॥ अपर्णेसी
बोधी शंकर ॥ पुढें करील प्रश्नोत्तर श्रोतें सावधान परिसावें ॥६९॥
इतिश्री परम रहस्य सारामृत ॥ टीका करूनी प्राकृत ॥ कृत कृतार्थ
मन्मथ ॥ सप्तमो ध्याय संपूर्ण हा ॥७०॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥



४

जाण ॥ ती तेथें दृढ झाल्यावीण ॥ लय न ह्मणावा सुज्ञानीं ॥५९॥
एवंभाव, मन, दृष्टि तिन्ही ॥ एकमते वर्तते ह्मणूनी ॥ लयलागे तया
योगानीं ॥ शुद्धकर्मी विमुक्ता ॥६०॥ तोच भाव तेची मन ॥ त्या दृष्टीचें
उन्मिळन ॥ कुमार्गीं लय होता जाण ॥ अधोगती प्राप्तपै ॥६१॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ लिंगभक्ति मिती ख्यातं गुरु हस्तंच जायते ॥
तदा भक्ति सफलं स्यात्कथं मत्प्रति रुत्तमं ॥८॥

टीका ॥ भक्त्या अनेक असती ॥ त्यांत श्रेष्ठ लिंग भक्ति ॥ गुरु मुखें
मंत्र जपती ॥ नेम निष्टें करूनि ॥६२॥ तेव्हां त्याची भक्ति सफल ॥
सांगा मजप्रति केवळ ॥ अन्य धर्मी वर्तता अचळ ॥ नर्क प्राप्त होय
तया ॥६३॥ इश्वरोवाच ॥

॥ श्लोक ॥ तत्प्राणो लिंग देहंच जातो गुरु करै रपि ॥ आचारं गौ-
रवं लिंगे जंगमंच प्रसादकं ॥९॥ महालिंग मिदं ज्ञय षड्विधं वर्तमान-
तु ॥ इति भेद न जानाति प्रसादं निर्फलं भवेत् ॥१॥० ४

टीका ॥ जो प्राण लिंगीं देहीं जन्मला ॥ गुरु करजात होऊन राहि-
ला ॥ आचार संपन्न बोलिजे त्याला ॥ जंगम प्रसादी जाणतो ॥६४॥

तेथें मुरालें ॥५३॥

॥ श्लोक ॥ एवं भेदंकला देवी सद्गुरु शिष्य मस्तके ॥ हस्ताब्ज प्रथमं गृण्हं तस्य भाव करोदितं ॥६॥

टीका ॥ शंकर ह्मणें पार्वतीशी ॥ ही अगम्यकला गुरुपाशीं ॥ तेणें कृपादृष्टि मस्तकाशीं ॥ अमृतकर ठेवितां ॥५४॥ जैशी अंधःकारीं लागली ज्योती ॥ तैसीच होय देहस्थिती ॥ अज्ञान जाऊन मागुतां ॥ सज्ञान बुद्धि उपजतसे ॥५५॥ परी जैसा हस्त पडता मस्तकीं ॥ तैसी ज्ञानशक्ति जडे तोकीं ॥ ज्ञानवृद्धि होय एकाएकी ॥ ॥ ती गुरुकृपा जाणावी ॥५६॥

॥ श्लोक ॥ यथाकला तथाभाव यथाभाव तथामनः ॥ यथामन तथा-दृष्टि र्यथादृष्टि स्तथालयः ॥७॥

टीका ॥ गुरु अनेक कलें असती ॥ तरी त्यांस गुरुच ह्मणती ॥ परी ज्ञानकळा जाणती ॥ तेच सद्गुरु जाणावें ॥५७॥ ह्मणूनी जैसा उपदेशी गुरु भेटें ॥ तैसीच ती ज्ञानकळा प्रगटें ॥ जैसा भाव तैशीच कळा उमठें ॥ शिष्यांगीं जाणपा ॥५८॥ भाव तैसें जाणावें मन ॥ मन तैशी दृष्टि होय

३ मोक्ष प्राप्त जाणवा ॥४५॥ हीच जाण सुक्ष्मविधी ॥ चित्स्वरूपाची होय समाधी ॥ तेव्हांची स्मृति पावें वृद्धि ॥ ती सुक्ष्मकला जाणावी ॥४६॥

॥ श्लोक ॥ वाचातीतं मनोतीतं वर्णातीतंच तत्पदं ॥ ज्ञानातीतं निरंजनं एवंकला सुक्ष्मा ङ्कवेत् ॥५॥

टीका ॥ मी वाणीचे पलिकडे आहे ॥ असें वर्णितीं शास्त्रेंसाहें ॥ तसेंच मनाच्यान्यायें ॥ हें न दिसें कदांपी ॥४७॥ वर्णातीत तेंची तत्पद ॥ ह्यास जाणावें लिंगशुद्द ॥ आणि त्वंपदाचाही भेद ॥ जीवात्मा जाणावा ॥४८॥ ही दोन पदाची ऐक्यता ॥ तीच होय अशी पदता ॥ वदता न वदवें अवचिता ॥ तत्स्वरूपीं निमग्न असें ॥४९॥ चारी वाचेचे पैलतीरीं ॥ मनाची धांव न होय पुरी ॥ विज्ञान संतलें देहांतरीं ॥ मग स्तब्ध मौनची ॥५०॥ तें मीमांस शास्त्रास अगम्य ॥ व्यक्ति भक्तींचें चीरसौम्य ॥ एका गुरु वांचून तें गम्य ॥ न लाभे जाण जीवा ॥५१॥ सूर्यास अंधार मुळीच नाहीं ॥ मग प्रयत्नें सायासें पाही ॥ अंधारा कारणें करणेंच नाहीं ॥ सदा प्रभा लखलखित ॥५२॥ हीच जाण ज्ञानकळा ॥ अंधःकार हा अज्ञान बाळा ॥ वस्तुचें ठायीं नसे वेळा ॥ अज्ञान ३

सांगितला तूज पूर्ण नेम ॥ आचरावा सत्यपै ॥३७॥ दुसरा मार्ग असे भजन ॥ निर्भीडपणें आनंदून ॥ करित जावें रात्रंदिन ॥ दुजी चिंता नसावी ॥३८॥ अबला जना हें सुलभ ॥ गर्व रहित गर्जवी नभ ॥ तनु मनें करी सौरभ ॥ प्रसन्न होती सिद्धिपै ॥३९॥ स्वधर्मी राखीता विश्वास ॥ तया पुण्यघडे विशेष ॥ मोक्ष प्राप्त अविनाश ॥ वीर लक्षण जाण हें ॥४०॥ परि जें जें संचलें संचीत ॥ उच्चारूनये वाचें आंत ॥ अर्पण करावें हें उचित्त ॥ शिवालागीं सत्वर ॥४१॥ हा महिमा परमाद्भूत ॥ लिंगधारी आचरती व्रत ॥ तपयोग त्यासची घडत ॥ जंगम भक्ता कारणें ॥४२॥ स्त्रीया लिंगपूजा करिती ॥ त्यांस नसती आधोगती ॥ दीक्षावंत सती पवित्र असती ॥ लिंगाईत धर्मनिष्ठ ॥४३॥

॥ श्लोक ॥ ज्वाला तेज जलाभास ततःकोटी समप्रभा ॥ तेशांतंच शिखा सूक्ष्मा चिद्रूपा परमाकळा ॥४॥

टीका ॥ जैशी अग्निची सतेज ज्वाला ॥ जळीं दर्पणीं दिसे प्रज्वला ॥ परी ती छाया असे सीतला ॥ तेवीं लिंग निष्ठ भक्तहे ॥ ॥४४॥ त्या ज्वालेच्या कोटप्रकाशें ॥ माझें रूप अविनाशें ॥ ध्यान पूजन अनयासें ॥

२ हृस्य वदनें करून ॥ सांगूं लागले तपोज्ञान ॥ पार्वती श्रवणें सावधान ॥
चित्त देऊन करीतसे ॥२७॥ तपश्चर्या योग कठीण ॥ न साधे संसारीं राहून ॥
त्या कारणें शेवावें वन ॥ योग सिद्धि तेणें होय॥२८॥ तपश्चर्ये कारणें प्राणी ॥
सावधानें अतःकर्णी ॥ शिवलिंग पूजेची वर्णी ॥ दीक्षेप्रती साधिती ॥२९॥
आसन ध्यान भस्म धारण ॥ गळा शोभे रुद्राक्षाभरण ॥ सदा शुची वस्त्र
परिधान ॥ करावा जप महामंत्रें ॥३०॥ मंत्र जपालागीं जाण ॥ तपनीं
घाली आसन ॥ नित्यनेम झाल्यावीण ॥ स्थानाचल न करावा ॥३१॥
सद्योजाता अवाहन ॥ असावें मन उन्मन ॥ चित्त चैतन्या व्यापून ॥
ज्ञान मुद्रा साधावी ॥३२॥ तेणें होय ज्ञानदृष्टि ॥ सम पहावी जगीं
सृष्टि ॥ कर्म सुटें परमेष्ठी ॥ जन्मलिया वेळीचें ॥३३॥ अकर्म जीव होता
जाण ॥ नकरी कोणा संभाषण ॥ शत्रु मित्र जया समान ॥ उदारशील
तापशी ॥३४॥ जयाचे वैखरीं शिव शिव ॥ हृदीं मुराला अहंभाव ॥
सवेची विज्ञान संभव ॥ आकळून रहातसे ॥३५॥ कर्तुमाकर्तुमाची २
शक्ति ॥ प्राप्त होय सहज गती ॥ तया सत्य देव मानिती ॥ चैतन्य वस्तु
ह्मणूनी ॥३६॥ हा माझा राजयोग उत्तम ॥ मानवा प्राप्तीचा अनुक्रम ॥

हा मायारूप असे ॥ परी निद्रेचेनी सौरसे ॥ निवांत झोपें अवलो-
कितसे ॥ तें अगम्य रूप अगोचर ॥१७॥ जाग्रत अवस्थे सरसे ॥
स्वप्नचा सर्व भास नासे ॥ तेवीं आकार जों जों दिसे ॥ तों तों नासे ॥
ज्ञानदृष्टीं ॥१८॥ देवी ह्मणें अज्ञान जनासी ॥ ज्ञान कसें होय अबलेसी ॥
तो ही उपाय सांगा जी मजशी ॥ कृपादृष्टि करूनिया ॥१९॥ आष्ट
प्रहरां एकें प्रहरीं ॥ सदाचार निष्टें शेवाकरी ॥ विश्वासें भजावें त्रिपुरारी ॥
निमषें निमषें करूनी ॥२०॥ जें निमिषें भजन घडे ॥ तितुकाची भव
विघडे ॥ पातकाचें सर्व तुकडे ॥ नाशती शिवपूजें ॥२१॥ किं सूर्य पल
पल चढें ॥ तों तों जगीं प्रकाश वाढें ॥ वाढतां वाढतां मध्याकडे ॥ पहातां
नये नेत्राशीं ॥२२॥ तैसें नित्यनेमें तप ॥ आरंभावें सुखरूप ॥ तयाचें
पुण्य प्रताप ॥ दैदिप्यमान सदा ॥२३॥ पुण्य वाढतां विशेष ॥ परात्मा
परपुरुष ॥ त्याचे हृदयीं विलाशे ॥ अनुक्रमें जाणपा ॥२४॥ तो अनुभ-
वितां अनुभव ॥ चित्तीं चैतन्याचा प्रसव ॥ विचार शक्तिचा गौरव ॥
ज्ञानध्वज फडकतसे ॥२५॥ देवी ह्मणें देवाधिदेवा ॥ तपश्चर्येचा मार्ग
दाखवा ॥ कैसें रीतीं नेम करावा ॥ उद्धार व्हावा येणेंची ॥२६॥ शंकर

पहातां पहातां जाण ॥ अचल भासें मूर्ति निर्गुण ॥ सांगतां नये तें गुढ
मौन ॥ गुरुकृपें ओळखावें ॥७॥ ह्मणून बोलती अव्यक्त ॥ जें सांगतां
नये विमुक्त ॥ वेद शास्त्रें मौन्य संसक्त ॥ नेतिनेति वदतसे ॥८॥ तीच
जाण परवस्तु ॥ निर्गुणरूप मदस्तु ॥ ब्रह्मांड व्यापून स्वस्तु ॥ सगुण-
रूप प्रसिद्ध ॥९॥ तेथेंची जी पूर्णकला ॥ ती तूं हिमनगबाळा ॥ ऐसी ही
सगुण लीला ॥ प्रगट केली सृष्टिलागीं ॥१०॥ आणखी सांगणें असें तुज ॥
तें जें अचल निर्मळ बीज ॥ ज्ञानशक्ति आरूढें सहज ॥ मागुती मिळे
रूपासी ॥११ कोणी ह्मणती बीज कैसें ॥ केवीं विरुढे आनयासें ॥ तरी
जाणावें काष्टीं वसे ॥ अग्निरूप जाग्रत पै ॥१२॥ परि तो मंथनावांचून ॥
न प्रगटे कदापि जाण ॥ घृत सिंपीतां कुंडांतून ॥ रूप आपुलें दाख-
वी ॥१३॥ जरी कुंडांमार्जीं अग्नि नसें ॥ तरी घृतें रक्षा काय प्रकाशे ॥ हें
तुज कळावें अविनासे ॥ ज्ञानदृष्टि करूनी ॥१४॥ जेवीं तीळामाजीं
तैल ॥ कीं पुष्पीं असे परिमळ ॥ तेवीं वस्तु कळा सकळ ॥ आकारा
आली असें ॥१५॥ आकार तो भ्रम भासत ॥ पहातां निराकारची
सत्य ॥ जैसें दुग्धामाजीं घृत ॥ लिप्त असे जाण देवी ॥१६॥ आकार

श्रीगुरुवेनमः ॥ षष्टम अध्यायीं संपूर्ण ॥ कथीलें षट्स्थलज्ञान ॥ पंचाक्षर षडाक्षर महिमान ॥ अत्युत्तम वर्णिलें ॥१॥ षड् लिंगाचें भेद सहा ॥ दाखविलें कृपें पहा ॥ त्यामाजीं चित्त तद्गुहा ॥ प्रवेशलें स्वभावें ॥२॥ तेणें वस्तुची लागली गोडी ॥ न उठें दृष्टि जडली वेडी ॥ परात्परा पहातां थोकडी ॥ बुद्धि वैखरी निमग्न ॥३॥ पार्वत्युवाच ॥

॥ श्लोक ॥ कोवा वस्तु यथाजातं कोवा भेद न ग्राह्यतां ॥ काकला तथा सुक्षमा ब्रूहिमे परमेश्वर ॥१॥

टीका ॥ वस्तु ह्मणजे कोण कैसी ॥ कोण्या उपायें चढे हातासी ॥ कोण भेद कळा योजनेसी ॥ सुक्ष्मरूपें सांगावें ॥४॥ ईश्वरोवाच ॥

॥ श्लोक ॥ निर्गुणं निश्चलं वस्तु अगम्य मव्यक्तं तथा ॥ वेद शास्त्रं न जानंति परब्रह्म सुगोच्चरा ॥२॥ यथातीले तथातैलं सर्वत्रा वस्थिता कला ॥३॥

टीका ॥ शिवह्मणें गिरिजे ऐक ॥ तुझें प्रश्न सुखदायक ॥ माझें उल्हासें निजसुख ॥ गूजगोष्टी सांगावया ॥५॥ अग्नि चक्राचें पैलतीरीं ॥ मसूर-प्राय छिद्रांतरीं ॥ विलोकितां अमरपूरी ॥ दृष्टिगोचर होतसे ॥६॥ तेची

श्री महा गुरवेनमः ॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ छायांग दृश्यते लिंगं प्राणो देहस्य मध्यमः ॥ प्राणस्य लिंग मध्यातं ब्रुहिमे परमेश्वर ॥१॥

॥ टीका ॥ पार्वती ह्मणें त्रिपुरारी ॥ लिंगीं देह मिश्रीत कोणेपरी ॥ प्राण असें देहा भितरीं ॥ तो देहाशी मिश्रीत कैसा ॥१॥ लिंग देह प्राण तीन्ही ॥ यर यरा मिश्रीत होऊनी ॥ वर्ते कैसा शूलपाणी ॥ स्पष्टपणें सांगामज ॥२॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ प्राणलिंग यथाजाता विद्यते सर्व मिंद्रिये ॥ इंद्रिय सर्व देहानां ॥ पावको सलिलं यथा ॥२॥

टीका ॥ जैसा प्राणलिंग सिद्ध झाला ॥ तैसे सर्व इंद्रयीं व्यापिला ॥ इंद्रयें सर्व देहीं भरला ॥ अग्नि जळा समपै ॥३॥ तरी लिंग देहीं असें मिश्रित ॥ दशेंद्रियीं लिंगार्चनी रत ॥ तोची लिंगांगीं प्राणी होत ॥ इष्टलिंगा नैष्टिक ॥४॥ असेची तुटली सर्व व्याप्ती ॥ लिंगमूर्ति जडली दीप्ती ॥ कीटक न्यायाची गती ॥ सहज पावें भाविक तो ॥५॥ तया नाम प्राणलिंगीं ॥ ऐशी पदवी जडली अंगीं ॥ वीरशैव कुलोत्पन्न जगीं ॥ अंश जाण शिवाचें ॥६

॥ श्लोक ॥ घट मध्यें स्थितं तोयं अग्नि र्ज्वलति बाह्यतः ॥ अग्नि ज्वालेन संयोगा दुष्णं भवति वार्यपि ॥१॥

टीका ॥ जैसें घटा मार्जी साठविलें जल ॥ बाहेरून लाविला वडवानळ ॥ तर्यी घटां अग्नि होता न लागे वेळ ॥ मग जळ कैसें राहे ॥७॥ तैसे परी देह स्थिती ॥ लिंग पूजे लिंग होतीं ॥ सर्वेची ऐक्य पार्वती ॥ शिवरूपा जाणावें ॥८॥ जंगम अथवा भक्त ॥ प्राण देहीं झाला सक्त ॥ गुरु कृपेची ही मात ॥ अन्य धर्मा नये पै ॥९॥ इष्ट, प्राण, भाव जाण ॥ ही लिंगाची मुख्य खूण ॥ गुरु मंत्रा आठवून ॥ पूजांता पुण्य विशेष ॥१०॥ पुढलि सोय असें एक ॥ सदाशिव पूजा देख ॥ न सोडावी लिंगपूजा ऐक ॥ प्राणहानी झालिया ॥११॥ लिंगपूजा सोडून मानव ॥ जरी भोगी राज्य वैभव ॥ तोही पावें नर्कार्णव ॥ भोगावया सत्य पै ॥१२॥ जो सर्व देवा असें श्रेष्ठ ॥ ज्या सर्व ऋषि मुनीसी वरीष्ठ ॥ सांगूं पार्वती तुज स्पष्ट ॥ तत्व तें शिव भक्तिचें ॥१३॥ जया मघवा विरंची ध्याती ॥ विष्णु नयन वाहे पूजेअंती ॥ तो लिंगरूपीं हृदय स्थिती ॥ राहे सदा वीरशैवा ॥१४॥ वीरशैव हृदया वरी ॥ लिंगमूर्ति

वसे जन्मांतरी ॥ तया विसरूनी देवता तरी ॥ पूजूं पाहती शतमूर्ख ॥१५॥
इष्टलिंगा भावें पूजीतां ॥ भक्त पावतसे तद्रूपता ॥ गुरु वाक्य विश्वा-
सें पाळीतां ॥ निर्गुण सायुज्जता प्राप्त ॥१६॥ शिवभक्त ह्मणवणें ॥ शि-
वाशीं न पुजनें ॥ तरी निरयासी जाणें ॥ क्रियाभ्रष्ट ह्मणूनी ॥१७॥
थोरवी मिरवी शिवाचाराची ॥ क्रिया आचरतसे भिन्नत्वाची ॥ जैसी
व्यभिचारिणी शेवा पतीची ॥ पर पुरुषीं जावया ॥१८॥ तैसा आपुला
आचार सांडून ॥ पर आचारीं वर्तवीं मन ॥ तो स्वान सूकर योनीं
जाण ॥ भोगील निःसंशयें ॥१९॥ आणखी सांगणें तुज एक ॥ ही कुल
वधूची रीति देख ॥ प्राण गेलीया न पाहे मूख ॥ पर पुरुषाचें सत्य
पै ॥२०॥ साति पति सदाचारें वर्तती ॥ तेवीं वीरशैव शास्त्र संमती ॥
एक निष्टें भजा लिंगमुर्ति ॥ दुजी भक्ति जारिणी सम ॥२१॥

॥ श्लोक ॥ अंतर्ज्ञानं क्रिया बाह्य एके भावे विशाष्यते ॥ यथा जलं यथा कुंभे बाह्याग्नीभिः प्रभावतः ॥४॥

टीका ॥ अंतरीं ज्ञान बाह्य क्रिया ॥ दोन्ही ऐक्यत्वं झालिया ॥ मग
कैचा प्रपंच उरे विलया ॥ न जाती शरण ॥२२॥ बाह्य क्रिया करी निपूण ॥

इष्टलिंगा पूजी अष्ट विधानें ॥ तेणें स्वभावें देहींप्राण ॥ लिंगरूप
कला पावें ॥२३॥ या लागीं स्वक्रिया न सांडी ॥ गुरुकृपें अंतरीं ज्ञान
२ धुंडी ॥ अन्य विचार ते पाखांडी ॥ स्वप्नीं न पहावें त्या ॥

॥ श्लोक ॥ तद्देह मिंद्रय नैव सर्वदा लिंग भोगिनां ॥ तन्मुखं पंच
वक्त्रंच प्राण लिंगस्य लक्षणं ॥५॥

टीका ॥ प्राणाची मलीनता गेल्यावीण ॥ प्राण लिंगीं न होय जाण ॥
दश इंद्रिय दमवून ॥ स्वाधीन ठेविजे ॥२५॥ प्राणाचें भोक्तव्य जेंजें ॥
तेंतें लिंगार्पित कीजे ॥ येणें स्वयें लिंग होईजे ॥ लिंगप्राणी ह्मणती
त्या ॥२६॥ या परी क्रिया आचरण ॥ हें प्राणलिंगीचें लक्षण ॥ क्रिया
आणि ज्ञानावीण ॥ न पावें मोक्षमार्ग ॥२७॥ एका ज्ञानेच करून ॥
उद्धरु ह्मणती अज्ञान ॥ कीं क्रिया साधु अभिमानें ॥ मोक्ष मिळवूं २
पहाती ॥२८॥

॥ श्लोक ॥ न क्रिया रहितंज्ञानं नचज्ञानं विनाक्रिया ॥ ज्ञानक्रिया
समंउक्तं सुसाध्य इष्ट कामदा ॥६॥

टीका ॥ क्रियेंविणें न शोभें ज्ञान ॥ आणि क्रिया नसे ज्ञानावीण ॥

पर वस्तु साधावया आन ॥ दुजे साधन नाहीं ॥२९॥ प्रकृति पुरुष दोन्ही ॥ एकाचमतें होऊनी ॥ सृष्टिकर्मे अनुदिनीं ॥ चालवित तैसे हें ॥३०॥

॥ श्लोक ॥ ज्ञानं क्रियाश्च संयुक्तं सफलं कर्म लभ्यते ॥ यथा पंग्वंध साह्यस्या तथा मुक्तो भविष्यति ॥७॥

टीका ॥ क्रियेविणें न शोभे ज्ञान ॥ ज्ञानेविण क्रिया शून्य ॥ उभय ऐक्य ह्मणून ॥ मुक्त असे प्राणी तो ॥३१॥ यासी दृष्टांत सांगतो एक ॥ तेणें संदेह फिटे देख ॥ आपलें मनिचा तवक ॥ जाग्रत राहे श्रवणा ॥३२॥ एक अंध दुजा पंगु ॥ उभयतां इच्छा भोगू ॥ तृप्त नोव्हे नेत्रांगू ॥ पंगू तैसाची चरणानें ॥३३॥ उभयतां क्रमीतां वन ॥ अग्नि प्रगटला दारुण ॥ तेव्हां यर यरा साह्य होऊन ॥ निघून गेलें दुजा वना ॥३४॥ ते कैसें गेलें वांचून ॥ त्यांचे सांगूं सत्य कारण ॥ अंध होता शक्तिमान ॥ पंगुसी वाहून नेले तेणें ॥३५॥ पंगु आपलें नेत्रें करून ॥ जिकडे जिकडे दाखवी खूण ॥ तिकडे तिकडे अंधें चालून ॥ अग्नि पीडा दूर केली ॥३६॥ तैसेंच ज्ञान क्रियें करून ॥ भव समुद्र

ओलंघून ॥ पावावें मुक्त रूपा जाण ॥ सत्य वचन पार्वती ॥३७॥ या
लागीं दुजी उपमा ॥ देणें न लागें सकामा ॥ परी संशय महिमा ॥ सहसा
न वर्णवें ॥३८॥ याचें करावया निरशन ॥ स्पष्ट सांगणें तुज लागून ॥
दोन वस्तु संयोगा वाचून ॥ तिसरें प्राप्त नोव्हे ॥३९॥ तैल वाती-
योगें प्रकाश ज्योती ॥ वाद्य वाजविल्या नाद उठती ॥ मेघ वृष्टिनें भुमी
संतोषती ॥ मग देती धान्यातें ॥४०॥ या लागीं क्रिया ज्ञानाविण ॥ मुक्त
झालों ह्मणें तो अज्ञान ॥ जरी संपादिलें वेदांतीं ज्ञान ॥ तरी स्वक्रिया
न सोडावी ॥४१॥ जैसा पक्षी उडे आकाशीं ॥ पाहवें तयाचें गतीसी ॥
उभय पंखाविणें त्यासी ॥ उडतांच नये पै ॥४२॥ तैसीच ज्ञान क्रिया उभय
पक्ष ॥ भावना शक्ति सर्वसाक्ष ॥ तया न्यूनता अमराध्यक्ष ॥ एक
पक्ष उडूं न शकें ॥४३॥ क्रिया कर्म बरवे करती ॥ परी वस्तु ज्ञाना न
नेणती ॥ तरी ते न अनुसरती ॥ सत्य शिव रूपाशीं ॥४४॥ जो ज्ञानेन
विश्व जाणितो ॥ क्रिया भक्तिते जो त्यागितो ॥ तो ही मोक्ष न
पाविजेतो ॥ अभक्त ह्मणोनिया ॥४५॥

॥ श्लोक ॥ गवां सर्पिः पोषणांहि शरीराणां करोतियत् ॥ तथा क्रिया ज्ञान-

शक्ति र्त्यांज्या नैव विनिश्चितं ॥८॥

टीका ॥ जैसें गायीचें दुग्ध नवनीत ॥ शरीरांचें पोषण करीत ॥ तरीच शरीर शक्ति अद्भूत ॥ जिंकितसे दुर्जयातें ॥४६॥ तैसें असें ही क्रिया जाण ॥ येणेची प्राप्त होय ज्ञान ॥ उपदेशा शोभायमान ॥ क्रिये वांचून ज्ञान नाहीं ॥४७॥ जैसी गाय तैसी क्रिया ॥ शरीरा ज्ञाना पोसावया ॥ तया सोडीता विलया ॥ जाय ज्ञान शरीर पै ॥४८॥ यास्तव एका ज्ञानें करून ॥ न होय सत्य योग साधन ॥ क्रिया आचरता निर्वाण ॥ विज्ञान येई हातां ॥४९॥ ऐसी क्रियेची आहे थोरी ॥ ज्ञान न करी बरोबरी ॥ क्रिया ज्ञान होता एकसरी ॥ विज्ञान प्राप्त पै ॥५०॥ विज्ञान तें कैसें ऐक ॥ जेथें खुंटला विवेक ॥ चिद्रूप ब्रह्म नैष्टिक ॥ भक्तांगीं संतोषें ॥५१॥ तेणें राहे समाधान ॥ अन्य विद्यें अभिमान ॥ गर्वित करी भाषण ॥ तें निंद्य ज्ञान जाणावें ॥५२॥ यालागी क्रिया ती गाय जाण ॥ तीचें कीजे भावें पोषण ॥ मग बुद्धि विवेकें दुग्ध दोहन ॥ लक्ष लावून तापवावें ॥५३॥ निश्चयाचे घाली विरझण ॥ नेमें घुसळावें रात्रंदिन ॥ स्वधर्मी विश्वासा अनुसरून ॥ नवनीत जाण

४ तापवावें ॥५४॥ तयाचें होता प्रसरण ॥ तों तों धर्म वाढे चोहोंकडून ॥ शास्त्राधार प्रगटून ॥अन्य ज्ञांतींत प्रसिद्ध ॥५५॥ शंकर ह्मणें पार्वतीसी ॥ घृता घेऊन गाय त्यागिसी ॥ किं क्रिया सांडून ज्ञानासी ॥ सत्यत्व मानूनको ॥५६॥ घृत नासें कांहीं काला ॥ अक्रिय ज्ञान तैसें बाळा ॥ दुर्गंध सर्पिचा कंटाळा ॥ तैसें जाण ज्ञान तें ॥५७॥ ह्मणून नित्य गायीचें दोहन ॥ तेंची घृतें शुद्धि अन्न ॥ बहु दिवसांचें करी वमन ॥ तेवीं ज्ञान अक्रियेचें ॥५८॥

॥ श्लोक ॥ ईश्वरुवाच ॥ भक्तो माहेश्वर श्चैव प्रसादी स्थावरं भवेत् ॥
प्राणलिंगीं शरण्यंच लिंगैक्य जंगम तथा ॥१॥

टीका ॥ शंकर ह्मणें हो गिरिजे ॥ षट्स्थलीं जें बोलिलें गुज ॥ तेंची संग्रही पूर्ण बीज ॥ ॥ भक्ता कारणें कळावया ॥५९॥ आतां स्थावर ४
जंगमांचीं स्थानें ॥ तूज सांगूं पूर्णपणें ॥ भक्त माहेश्वर प्रसादी जाण ॥ यास स्थावर मानिजे ॥६०॥ प्राणलिंगीं शरण्य आणि ऐक्य ॥ हें माझें सर्वदां प्राणाधिक्य ॥ तया वेगळा मी हें अशक्य ॥ जंगम रूपा ओळखावें ॥६१॥ ऐसें हें मम स्वरुप ॥ जाणून तूं सुखरूप ॥

तैसें परी जगीं आमुप ॥ प्रगट कीजे हिमनगे ॥६२॥

॥ श्लोक ॥ स्थावरं जंगमं चैव द्विविधं लिंग मुच्यते ॥ तद्वरं चर संस्कारो स्थावरो जंगमो भवेत् ॥१०॥

टीका ॥ स्थावर आणि जंगम ॥ ही दोन लिंगे उत्तम ॥ परी चर-लिंगा पूजा नेम ॥ विशेष पुण्या कारणें ॥६३॥ स्थावर लिंगाचर संस्कार ॥ करून अर्चंति लिंगाकार ॥ दुसऱ्या नाहीं हा आधार ॥ चर संस्कार करावया ॥६४॥ स्थावराचे होय जंगम ॥ जंगमाचे स्थावर हा भ्रम ॥ गुरु वांचून न कळे सप्रेम ॥ स्थिर चर कायते ॥६५॥

॥ श्लोक ॥ स्थावरं जंगमंचैव द्वयमेक समन्वितं ॥ इतिभेद परिज्ञानं दुर्लभं श्रुणू पार्वती ॥११॥

॥ टीका ॥ स्थावराचे होत जंगम आणि जे असे स्वयें जंगम ॥ तरी ते दोन ही शिवासम ॥ चर तया मानावें ॥६६॥ स्थावर हे होय भक्त ॥ तया संस्कारील्या जंगम होत ॥ तेथें नमस्कारा अधिकार रहात ॥ दुजी क्रिया वर्जावी ॥६७॥ क्रिया शुद्ध असें ज्यांची ॥ पूर्णभक्ति मानूं त्याची ॥ ज्ञान क्रिया उभ-याची ॥ श्रद्धा असावी पै ॥६८॥ ही माझी आत्मशक्ति ॥ मी तूज

सांगितलीं समूळ युक्ती ॥ तैसीच अचरावी पार्वती ॥ तरी योग्य धर्म तो ॥६९॥ लिंगांगी धर्म अति सुक्ष्म ॥ क्रिया तैसीच तिक्षण क्रम ॥ उत्तम धर्माचा हा नेम ॥ कठीणच जाणीजे ॥७०॥ वीरशैव मतां बोधी ॥ इतर धर्मांची नलगे उपाधी ॥ तत्वा तत्व सर्वज्ञ संबंधीं ॥ असे उत्तम धर्म हा ॥७१॥ त्यां माजीं हा परम रहश्य ॥ ग्रंथ उभविला हा परमेशें ॥ लिंगाईत धर्माचे धर्माधिश ॥ मम चिन्हें मांडित पै ॥७२॥ हा ग्रंथ अति उत्तम ॥ लिंग भक्तिचा नित्यनेम ॥ तया साठीं अनुपम ॥ निर्मियेलें ज्ञान पै ॥७३॥ जो येथें न धरी विश्वास ॥ त्याचा सदा होय कार्य नाश ॥ अदरें रुढवी जगास ॥ लिंगभक्ति थोर असे ॥७४॥ शील क्रिया भक्ति धर्म ॥ नम्रपणें वर्तता विक्रम ॥ पर धर्माचा तुटे भ्रम ॥ स्वधर्मांकुर विरुढलिया ॥७५॥ स्वधर्माचे करावें मंडन ॥ परधर्माचे होय खंडन ॥ असे दृढ शास्त्रांतून ॥ वाक्यें शोधून पहावी ॥७६॥ इतिश्री परम रहश्य सारामृत ॥ ईश्वर पार्वती प्रती सांगत ॥ त्याचा साध्यतं मथीतार्थ ॥ आदरें श्रूत केला ॥७७॥ इतिश्री प० सा० टी० क० कृत कृ० म० ॥ आ० सं० हा

आष्टम अध्याय ८.

श्रीपरब्रह्म इष्ट लिंगायनमः ॥ देव्युवाच ॥ श्लोक ॥ भक्तमार्गं कथं भेदं भक्तमार्ग कथं गुणः ॥ इतिभेद न जानामि ब्रूहिमे परमेश्वर ॥१॥

टीका ॥ पार्वती ह्मणे देवोत्तम ॥ भक्त कोणास असे नाम ॥ त्याचे मार्गाचा हि नेम ॥ कैसा असे श्रुतकरा ॥१॥ तैसेच हे त्याचे भेद गुण ॥ सांगा स्वामी मज लागून ॥ मजहि नकळे ह्मणून ॥ प्रार्थीतसे आपणा ॥२॥ ईश्वरोवाच ॥ श्लोक ॥ सदाचार शिवभक्तिः एकधी लिंग जंगमे ॥ न पस्यान्य देवाश्च गुरु वचन पालकः ॥२॥

टीका ॥ शिव शक्तिसी सांगे वर्म ॥ सदाचारें करी धर्म ॥ शिव भक्तिचीय धाम ॥ भक्त तयासी ह्मणावें ॥३॥ जो एकनिष्टें करून ॥ लिंग पूजा करी जाण ॥ जंगम शेवा एक दिन ॥ न चुकवी साक्ष पें ॥४॥ जो अन्य देवा न पाही ॥ भक्ति असे गुरु गृहीं ॥ तयाचें वचन कदांहि ॥ मोडूं न शके भक्त तो ॥५॥ गुरु भक्त गुरुदेखे ॥ गुरु शिष्यांतें कौतुकें ॥ हस्य करूनी स्वमुखें ॥ जगस्थिती विचारी ॥६॥ तेव्हां भक्तं सांगे मात ॥ माझेकुल गुरुभक्त ॥ लिंगपूजा कैसी होत ॥ तेची पहात आवडीनें ॥७॥ जगीं काय असे स्थिती ॥ ती मी नपाहे

मागुती ॥ एके भक्ति शिवमूर्ति ॥ अवलोकित वेळोंवेळां ॥८॥ तीर्थ प्रसादाची आवडी ॥ शेवितां तुटे भवबेडी ॥ असत्य मानीं तो पाखंडी ॥ शिवद्वेषी जाणावा ॥९॥ जंगम देखताच दृष्टी ॥ धांवून पायीं घाली मिठी ॥ चरण रजातें ललाटीं ॥ लावीतां पातक नाशे ॥१०॥ प्राण गेला तरी जावो ॥ परी न सोडी निष्ठा भावो ॥ तोची निज भक्तिसाठीं देवो ॥ तिष्ठतसें तया सवे ॥११॥ या नांव भक्त स्थल ह्मणती ॥ स्वयें तनुमन आर्पिती ॥ जंगम प्राण्यास नमिती ॥ धन अर्पिती अपार ॥१२॥ जेजे भोग ते जंगम लिंगाचे ॥ जें कष्टें देह प्रारब्धाचें ॥ असें नियम सदा ज्याचे ॥ तोची भक्त जाणावा ॥१३॥ उठूनिया प्रातः-काळीं ॥ काळजी वाहे एक वेळीं ॥ जंगम रूपाची टोळी ॥ दृष्टि पडों आमूच्या ॥१४॥ भोजन वेळीं जंगम गुरु ॥ आदरें करून सिष्टाचारु ॥ संपादून क्रियावीरु ॥ नमस्कार घालितसे ॥१५॥ भोजनोत्तर मुखशुद्धि ॥ तांबूल अर्पितसे सुधी ॥ भावें करून उपाधी ॥ शरण होत प्रीतीनें ॥१६॥

॥ श्लोक ॥ भृत्याचार समाचारं जंगमं लिंग रूपिणं ॥ द्वयमेक समा-

युक्तं भक्ति स्थल सुबुद्धिवान् ॥३॥

टीका ॥ शेवक भाव अंगीं धरून ॥ भक्तीचा अभिमान सोडून ॥ लिंग जंगम एक भावें पूजून ॥ लीनराहे स्वधर्मी सदां ॥१७॥ वीरशैव ह्मणती तया ॥ जे अलिंगीची उत्तम विद्या ॥ गृहण नकरी प्राण गेल्या ॥ जंगम बीज साच पै ॥१८॥ स्वधर्मीचा विद्यागुरु ॥ यासीच ठेवावा सिष्ठाचारु ॥ विद्या उदेल्या वादाचारु ॥ सफल होय धर्मनिष्ठा ॥१९॥ जरी विद्यागुरु अन्य जाती ॥ त्याचा अभिमान वाहे चित्तीं ॥ स्वधर्मी भ्रष्ट होय मती ॥ ह्मणून तया त्यागावें ॥२०॥ स्वधर्माभिमानी गुरु ॥ करावा हा शास्त्राचारु ॥ परिस टाकूनिया गारु ॥ कासया जाण ठेवावी॥१८॥ लिंगांगी पाहता डोळां ॥ अन्य ज्ञाती मुरडे कपाळा ॥ निंदा वादाच्या लीळा ॥ हर्षून टाळी वाजवी ॥२१॥ शुद्ध कर्म नसें ज्याचें ॥ तो परधर्मी विद्यावाचें ॥ उच्चारून गर्वमनिचे ॥ स्थापितसे आत्मशक्ति ॥२२॥ लिंगीं भिन्नभाव धरितां ॥ केलेंकर्म निर्फल तत्वता ॥ मग मुक्ति सायुजता ॥ कैसी येई हातासी ॥२३॥

॥ श्लोक ॥ गुरुं धर्माभिमानंच लिंगा भिष्टंतु जंगमः ॥ उपचार्यं

२ सदाचारो भक्तोमान्य दिनेदिने ॥४॥

टीका ॥ धर्माभिमान असावा गुरुसी ॥ भावें शिष्यें पाळीत अज्ञेसी ॥ कदापि न चुकती वचनासी ॥ धर्मा भिमानीते ॥२४॥ लिंगाचा इछीत हेतु ॥ पूर्णकर्ता जंगम भक्तु ॥ तया वेगळीं मातु ॥ नसे जाण दुसरी ॥२५॥ यालागीं वीरशैवीं ॥ दुजी शेवा नकरावी ॥ इष्ट लिंगासी अर्पावी ॥ शुद्द कर्मे आपुली ॥२६॥ अमृता हुनी अधिक ॥ प्रसाद मानिती देख ॥ पंक्ती भोजन अवशक ॥ इछितसे भक्त पै ॥२७॥ शिव सांगे गणाप्रती ॥ जे शिवाचारें वर्तती ॥ तया नसें अधोगती ॥ सत्यजाण वचन हें ॥२८॥ भक्त तयासची नांव ॥ यरा नसे अनुभव ॥ भवाचें भय सावेव ॥ स्वप्नीं नसें पहावया ॥२९॥

॥ श्लोक ॥ प्रभाते मुखं प्रक्षाल्य तथा चरण हस्तयोः ॥ दंतधावन कुर्वीत लिंगोदके शुचि र्भवेत् ॥५॥

टीका ॥ प्रातःकाळीं उठून सत्वर ॥ शौच मार्गें मौन परस्पर ॥ न बोलता यरयर ॥ परतून यावें स्वगृहीं ॥३०॥ ऐसें स्तब्द येण्याचा काय हेतु ॥ स्व मस्तकांतील ज्ञानतंतू ॥ तया खर्ची घालूंनये व्यर्थु ॥ २

योग्य विचारा योजावें ॥३१॥ जो जो बोलण्याचा व्यापार ॥ तों ज्ञान तंतु होत निरजर ॥ निद्रेअंतीं तयाचें अंकुर ॥ सतेज पुन्हा होत पै ॥३२॥ ह्मणून तया खर्ची व्यर्थ ॥घालूंनये हे यथार्थ॥ शिक्षक गुरु समर्थ ॥ सांगतसे शिष्यातें ॥३३॥ घरीं येता परतून ॥ मृत्तिका करा लावून ॥ वर उदक दुसऱ्या कडून ॥ घ्यावें तेणें क्रिया शुद्ध ॥३४॥ पाद प्रक्षाळण करून ॥ मग लिंगोदकें मुख मंडण ॥ दंताचा मल धुऊन ॥ टाकीसत्य नित्यदिनीं ॥३५॥ येणेपरीकीजे मुखमार्जन ॥ परी अर्धमुखीं अर्ध करी जाण ॥ तें उदक ललाटीं दोष ह्मणून ॥ त्यागावी ती क्रिया ॥३६॥ स्नान केल्याविणें स्वयपाक ॥ केलिया अनाचार पातक ॥ घडे असें शास्त्रादिक ॥ सांगती वेळोंवेळां ॥३७॥ स्त्रीया शुचिभूत असाव्या सदा ॥ करुंनये भविस्पर्श कदां ॥ जरी असें संसारीं अपदा ॥ तरी आचारा सोडूंनये ॥३८॥ स्वधर्माचारे वर्तता ॥ इंद्र संपत्ती येहाता ॥ खोटें नाहींहो सर्वथा ॥ स्वधर्म निष्टा श्रेष्ट ॥३९॥ पाक झालिया पात्र शुद्धि ॥ करावी भस्म धारणें अर्धी ॥ अतीत पंक्ती सत्यविधी ॥ भोजना लागीं असावा ॥४०॥ लिंगपूजा होता क्षणीं ॥ नैवद्य

अर्पण मंत्रे करूनी ॥ लिंगार्पित प्रसाद मानूनि ॥ गृहण करी-
सदा ॥४१॥ वीरशैवाचें घरचें अन्न ॥ पवित्र असें परिपूर्ण ॥ तयाचें
अंश घरांतून ॥ बाहेर कदां नव जोंव ॥४२॥ यास्तव तयाचा स्पर्श ॥
घेतां देतां जेवतां विशेष ॥ आसन वस्त्रा अंगा लेश ॥ लागूं देतां दोष
घडे ॥४३॥ ऐशी क्रिया लिंगधर्मी ॥ पाळीतो विशेष मर्मी ॥ तयाची
नित्य लक्ष्मी ॥ वाढतसें दिनेदिने ॥४४॥ वीरशैव सदाचार स्थिती ॥
जाणें तो एक जंगम मूर्ति ॥ जन्म संस्काराची स्फूर्ति ॥ प्रगट कीजे
सत्वर ॥४५॥

॥ श्लोक ॥ गर्भाधाने पुंसवने सिमते जात कर्मणि ॥ तथा दीक्षा
प्रभावेन लिंगनिष्ट भवेत् धृवं ॥६॥

टीका ॥ गर्भाधान हा संस्कार ॥ सर्वासीच असावा साचार ॥
त्याचा न करावा अनादर ॥ पंचाचार विधिनें ॥४६॥ हाचिजाण संस्कार
प्रथम ॥ दुजा तो डोहळे इच्छा काम ॥ तिसरा ही पुण्य पराक्रम ॥
जनना पूर्वी होतसें ॥४७॥ चौथा तो जातकर्म जाण ॥ जन्मकालीं लिंग
धारण ॥ असें शास्त्र बोलें वचन ॥ वीरशैव धर्माचें ॥४८॥ असें हें चार

गर्भ संस्कार ॥ वीरशैव धर्माचे प्रकार ॥ तया धर्माध्यक्ष वारंवार ॥
श्रुतकरी लिंगाईता ॥४९॥ नामकर्ण बारावें दिवशीं ॥ उत्साह करून
बालकाशी ॥ नांव ठेवणेंच अनयासी ॥ आप्त गोत्रा कळावया ॥५०॥ हा
उत्साह मोठ्या आनंदानें ॥ स्त्रीया पुरुष हें समाधानें ॥ करिती सुवंशा
कारणें ॥ सुपुत्र कंन्या व्हावया ॥५१॥ अन्न भक्षणाचा विधी ॥ धर्मनिती
दिनशुद्धि ॥ पाहून उदयसंधि ॥ ग्रह शुभ स्थानांशीं ॥५२॥ उपनिश
क्रमण ह्मणती ॥ जेथें असें ती परम भाक्ति ॥ शिशुस चालावयाची
शक्ति ॥ आणूं पाहती आवडीं ॥५३॥ चौल संस्कार आठवा ॥ देह
स्थितीचा मानावा ॥ सुख दुःखाचा वानवा ॥ कळतसे तेणें पै ॥५४॥
सर्व संस्काराचा राजा ॥ जयाचे नियोगें पूजा ॥ करितां घडे पुण्य-
काजा ॥ स्वधर्म निष्ठातें ॥५५॥ दीक्षा संस्कारां वांचून ॥ लिंगाईतच
नोव्हे जाण ॥ ज्ञाति धर्माची असें खूण ॥ सत्य जाण पार्वती ॥५६॥
लिंगाईता हा संस्कार ॥ लागूं आहे शास्त्राधार ॥ तया वांचून क्रिया-
चार ॥ शुद्ध नसे आचारा ॥५७॥ जंगम दीक्षा असें दुसरी ॥ अगाध
असें तयेची थोरी ॥ माहेश्वरी अधिक तिसरी ॥ वंद्य पूज्य देवा-

४

दिका ॥५८॥ ह्या दोन्ही दीक्षा जाण ॥ गुरु पदाचें भूषण ॥ स्वधर्मांचा अभिमान ॥ येणें राहे सत्य पै ॥५९॥ ह्मणूनिया धन्य ते भक्त ॥ जे झाले गुरु करजात ॥ तोचि वीरशैव सद्भक्त ॥ अन्य धर्मा वेगळा ॥६०॥ असे धर्मनिष्ठ भक्त असती ॥ ते माझे मुगूटमणि पार्वती ॥ तो आत्मा मी देह ऐसी स्थिती ॥ शिवस्वयें सांगतसे ॥६१॥ हें येथें झालें नऊ संस्कार ॥ पुढें विवाहाचा होय प्रकार ॥ गोत्र सूत्र वधु कुलाचार ॥ पाहुनिया योजावें ॥६२॥ हें असें दश संस्कार ॥ तया पुढें धर्मपर ॥ सांगून अंतीविचार ॥ मुख्य संस्कार हे ॥६३॥ याचपरी उपसंस्कार ॥ षोडशसंख्या विधिसमग्र ॥ त्याचा विधिमंत्र फार ॥ लिहिले असें धर्म शास्त्रीं ॥६४॥ तें पाहून लिंगधारी ॥ सर्व विधिप्रेमें करी ॥ असत्य मार्नीं तो भिकारी ॥ जन्मो जन्मीं होईल ॥६५॥ जो याच नेमें स्व- धर्म ॥ कदां न होय चित्ताभ्रम ॥ सावधान अति सप्रेम निष्ठा असें धर्मावरी ॥६६॥ ह्या वरील संस्काराचें मंत्र ॥ महाशुद्ध आणि पवित्र ॥ तया वेगळें स्वतंत्र ॥ दुजें मंत्रच नसती ॥६७॥ हें मंत्र उपाचार्य मुखीं ॥ वसती सदां पुण्य श्लोकीं ॥ त्या वेगळें मिरवि शखी ॥ तया- ४

अज्ञान मानावें ॥६८॥ उपचार्यें आपलें कर्म ॥ सांभाळावें मुख्य धर्म ॥ तयाचा मंत्रापाशीं प्रेम ॥ सार्वकाळ असावा ॥६९॥ उपाचार्य जंगम असती ॥ ते लिंगाईता प्रती पाळीती ॥ आचार धर्माची काळजी वाहती ॥ सावरिती वेळोंवेळां ॥७०॥

॥ श्लोक ॥ पार्वत्युवाच ॥ जंगमस्य कथंरूपं जंगमस्य कथं गुणः ॥
जंगमस्य कथं भेदः ब्रूहिमे परमेश्वर ॥७॥

टीका ॥ पार्वती ह्मणें शंकरासी ॥ जंगमरूप सांगा मजशीं ॥ जंगम ह्मणावें कवणासी ॥ हें सांगा सत्वर पै ॥७१॥ जंगमाचें लक्षण भेद ॥ कैसा आचारें वर्तेंशुद्ध ॥ कोणा सांगें कैसा बोध ॥ श्रुत करा जगदिशा ॥७२॥

ईश्वरुवाच ॥ श्लोक ॥ जंगमो ज्ञान रूपंच उपाधि र्निरूपाधिकः ॥
भक्त प्राण समाख्यातो इत्यते लिंगीजगमः ॥८॥

टीका ॥ सदाशिव ह्मणें मेनका ॥ जंगमरूप ज्ञानदेखा ॥ तें तयावांचून आनेका ॥ प्राप्ताचि न होय पै ॥७३॥ आतां तें ज्ञान ह्मणसी कोण ॥ जाणणें वस्तुचें जाणपण ॥ तोचि मी स्वयें झालों आपण ॥

जंगमरूप जाणीजे ॥७४॥ वस्तु होऊन सदां शांत ॥ सदां शिवानंदीं
५ डुल्लत ॥ कर्तुमाकर्तु मन्यथा हेत ॥ करून अकर्ता जो ॥७५॥ मी तूं
पणाचा भास जयासी ॥ नसें कदांकाळीं तयासी ॥ द्वेष मत्सर हे रागा-
सी ॥ न पावें सदय तो ॥७६॥ जंगम हा जग भरीत ॥ जगाचा आत्मा
होऊन रहात ॥ शुद्ध वीरशैव मार्गे वर्तत ॥ तया जंगम जाणावें ॥७७॥
तोची सद्‌गुरु मोक्षदाता ॥ दाता होऊन नसे अहंता ॥ पर दुःखाचा
होय भोक्ता ॥ आनंदींत प्रेमानें ॥७८॥ आणि तो बद्ध मोक्षांतीत ॥
वस्तु रूपची साक्ष भूत ॥ तया नसे बद्धता येत ॥ विश्व रूपची
जाणावें ॥७९॥ तो स्वयें स्वरूपचि होऊन ॥ असें निर्विकल्प निर्गुण ॥
अशा रहित समाधान ॥ असे तोची जंगम पै ॥८०॥ ऐसा जंगम जो
वीरशैव ॥ तोची भक्ताचा सगुण जीव ॥ न धरी कदांपि द्वेषभाव ॥ स्व- ५
धर्मी जना तारक ॥८१॥

॥ श्लोक ॥ काम क्रोधविनि मुक्तो लोभ मोहादी विवर्जितः ॥ भवी
कर्म परित्यज्य श्रेष्ठतुं मम जंगमः ॥९॥

टीका ॥ काम क्रोधासी विरहीत ॥ मोह दंभा तें अमानीत ॥ लोभ

संग वमन पहात ॥ तोची श्रेष्ठ जंगम ॥८२॥ काम तो बहुपारि असें ॥
भोग मोक्ष कामची वसे ॥ स्वर्ग भार्गी अमृत असें ॥ मृता जीवन
करावया ॥८३॥ एक काम राज्य भोगासी ॥ इच्छिती जग ते लक्ष्मीसी ॥
एक तें पाताळ भोगासी ॥ लुब्ध होती पाहुनी ॥८४॥ इतुकें काम
असती ॥ विषय काम अधोगती ॥ इंद्रियावरी प्रेम नेती ॥ सत्य नोव्हे
कर्मतें ॥८५॥ एक काम धनावरी ॥ धन जोडिती परोपरी ॥ धनालागीं
अधर्म करी ॥ गोष्टी सांगे शास्त्रीच्या ॥८६॥ कोणा मुक्तिची कामना ॥
सदा वाहतसें मना ॥ परि न नेणें आपणा ॥ कीं मी मुक्तची असें ॥८७॥
येणें परि कामें थोर थोरासी ॥ नाडीलें असें बहुतासी ॥ तया त्यागून
असें त्यासी ॥ शुद्ध जंगम बोलीजे ॥८८॥ स्त्री काम असें महा बाधक ॥
तयासी त्यागीता बहुसुख ॥ लुब्ध होऊन ब्रह्मादिक ॥ मानहानी
पावलें ॥८९॥ तैसें नोव्हेचि जंगम जाण ॥ तयानें काम टाकिला
जिंकून ॥ पर स्त्रियेसी न पाहे ढुंकून ॥ शिव स्वरूपीं निमग्न पै ॥९०॥
कामाचा जेथें होतसे ऱ्हास ॥ तेथें ठाव नुरेचि क्रोधास ॥ निं-
ष्कामें ज्याचे पूर्णमानस ॥ शुद्धजंगम तोची असें ॥९१॥ जो लाभ इच्छा

धरितां पोटीं ॥ तयासीच लोभ उठाउठी ॥ मोहिलें स्त्री पुत्राचें संपुटीं ॥
माया तीच जाणावी ॥९२॥ सुपदार्थ दृष्टीं देखोन ॥ तेथें इच्छा करी
लोभ धरून ॥ किं कुकर्मास आश्रय देऊन ॥ वर्ते तया जंगमा त्य-
जावें ॥९३॥ स्वतः नपाळी शास्त्रनिति ॥ सांगे तयासी उपदेश देती ॥
अधर्में कुळ नरका जाती ॥ सत्य जाण देवीहें ॥९४॥ स्वधर्मिंची जो करी
निंदा ॥ स्वकर्णें करून एके सदा ॥ न देत प्रत्युत्तर कदां ॥ जंगम वंश
नव्हेची ॥९५॥ जो जंगम होऊन श्रेष्टपदा ॥ सदाचारें पावला एकदां ॥
संसर्गिंची सावरी संपदां ॥ तो वेश धारी जाणावा ॥९६॥ जंगम वेश
घेऊन ॥ जो धर्मास लावीजन ॥ तो असें सदा पावन ॥ सत्य जाण
देवी पै ॥९७॥ ज्ञाती जंगम असून ॥ नधरी धर्मा भिमान ॥ तो स्वान
सुकर योवन ॥ भोगी जाण साचहें ॥९८॥ जो अखंड स्वधर्माते ॥ प्रती
पादी सदा स्वार्थे ॥ धर्म प्रसिद्ध जगातें ॥ जंगम वंश तोची ॥९९॥
स्वधर्माचारें वर्तून ॥ जो स्वस्त्रीसी करी गमन ॥ परस्त्री मानीं वमन ॥
जंगमोत्तम तोची ॥१००॥ शंकरानें पार्वतीप्रती ॥ निरोपिली जंगमस्थि -
ती ॥ वीरशैव धर्माचीस्तुती ॥ उच्चारितां पुण्यबहू ॥१०१॥ इतिश्री प० स०

नवरू. रा.

॥ श्रीशिवपरमात्मरूपाय नमः ॥ श्रीगुरुवे नमः ॥ देव्यु वाच ॥श्लोक॥
जंगमोवाथ लिंगोवा प्राणलिंगः कथंभवेत् ॥ केनाचिन्ह जंगमस्य श्रुत
मिच्छामि सादरं ॥ १ ॥ टीका ॥ पार्वती ह्मणे शिवाप्रती ॥ जंगम अथ
वा लिंगमूर्ति ॥ प्राण लिंगाची कैसी स्फूर्ति ॥ सांगा मजला स्वामिया
॥ १ ॥ आतां विचारूं मुख्यखूण ॥ जंगमाचें कवण चिन्ह ॥ इच्छा उदे
ली मज पूर्ण ॥ आदरें करून श्रुतकरी ॥ २ ॥ ईश्वरु वाच ॥श्लो-
क ॥ जंगम लिंग माख्यातं द्वयोनित्य प्रवर्तते ॥ द्वयो मेको समा युक्तं
श्रेष्ठंतुगुरु जंगमः ॥ २ ॥ टीका ॥ जंगम आणि स्थावर ॥ बोलींजे द्वय
विचार ॥ भेदकैसा वर्ते सार ॥ ऐकशक्ती सावध पणें ॥ ३ ॥ एके रूपीं
लिंग जंगम ॥ असतीजाण सप्रेम ॥ यालागीं गुरुत्वाचा नेम ॥ तया
प्राप्त झालासें ॥ ४ ॥ सद्योजातादि पंचवदनें ॥ मम मुखें प्रसिध्द जा
ण ॥ तेथून उद्भवले तीच खूण ॥ जंगम लिंगाची असेपै ॥ ५ ॥ जंगम
आणि लिंगएक ॥ बाह्यनामाचा भेद देख ॥ परिअसे सदा व्यापक ॥ स-
र्वाठायीं मम प्रीये ॥ ६ ॥ जेवीं पुष्प परीमळांत ॥ कीं परीमळ असे पु-
ष्पांत ॥ भेदनाहीं यर येरांत ॥ तेवीं लिंगजंगमा जाणावें ॥ ७ ॥ रस

जलांत कीं जल रसांत ॥ गूळ गोडींत कीं गोडीगुळांत ॥ तैल जेवीं वसेतीळांत ॥ तेवीं जंगम लिंगांत ॥ ८ ॥ ज्याचें दर्शनमात्रें करून ॥ संपूर्णतीर्थै होती पावन ॥ तोसकळा श्रेष्ठ पूज्यमान ॥ लिंग निष्टें करूनिया ॥ ९ ॥ श्लोक ॥ मुखे मंत्र हृदिध्यानं प्राण लिंग समाश्रुतं ॥ पर मूर्ति मधिष्ठानं यतज्जंगम लक्षणं ॥ ३ ॥ टीका ॥ मुखामाजीं शिव स्मरण ॥ हृदयीं थोपलें तेंचीध्यान ॥ प्राणलिंग संचरूण ॥ जंगम लिंगचते ॥ १० ॥ इष्ठ लिंग तो अर्चालिंग ॥ प्राण लिंग तो ध्यानआंग ॥ समाधिस्तराहे नोव्हेभंग ॥ जंगम प्राणी जाणतो ॥ ११ ॥ श्लोक ॥ निःशब्दं स्थावरं चैव समंत्रो जंगमोभवेत् ॥ लोक पूज्य करं श्रेष्टं देवता लिंगजंगमः ॥ ४ ॥ टीका ॥ स्थावरास मंत्रनाहीं ॥ त्यास स्थापन मंत्र पाही ॥ जंगम मंत्रें जीवन राही ॥ यरवीं तें निर्जीव ॥ १२ ॥ म्हणून जंगम तो सर्वास ॥ पूज्य मान आहे वीरशैवास ॥ ॥ तयापूजीता होय पाप नाश ॥ निजभक्ताचें सत्यपै ॥ १३ ॥ सद्भावें पूजीता नेमें ॥ भव पाशतोडीला यमें ॥ शिवपदीं मनरमे ॥ तोची मुमुक्षुजाणावा ॥ १४ ॥ विश्वासें नपूजी गुरू ॥ तोकदां नोव्हे पैल

पारू ॥ जंगम लिंगाचा महिमाथोरू ॥ किती म्हणूनि वर्णावा ॥ १५
श्लोक ॥ निःसंगत्वे निराभासं निस्सीम निरोपाधिकं ॥ निर्देहं निर्मलं
नित्यं यतज्जंगम लक्षणं ॥ ५ ॥ टीका ॥ जो निसंग रूपींवर्ते जगीं ॥
कैचालोभ मोहतयाआंगीं ॥ मूळ उपाधी लावि मार्गी ॥ विदेह स्थिती
असेतो ॥ १६ ॥ निर्मळ अंतः कर्णशुध्द ॥ तैसेच सबाह्य मानीं बुध ॥
विचाराचा सार प्रसिध्द ॥ आनंदानें दावी तसे ॥ १७ ॥ जंगम पद
गुरु जाणा ॥ ऐका तयाच्या सर्व खुणा ॥ गुरुस्थला पासून आपणा ॥
मोक्षप्रात्पी होतअसे ॥ १८ ॥ शरण अलिया जंगमाशी ॥ जंगमपद
देत शिष्याशी ॥ भिन्नभाव नधरितां मानसीं ॥ निर्मल अतः कर्णीजाण तो
॥ १९ ॥ शिष्य जंगम पदघेऊन ॥ गुरुपणा मिरवी धुडकाऊन ॥
कृतघ्न निंदीजंगमा लागून ॥ अपकीर्ति होयत्याची ॥ २० ॥ जंगम
कुलीचा सुदृढ ॥ कुमार असावा पदा रुढ ॥ जंगम वेशदेऊन हूड ॥
नमिरवावा सिंव्हासनीं ॥ २१ ॥ तेणें होय धर्मभ्रष्ट ॥ पापेअचरती
अरिष्ट ॥ तया योगें रोग कुष्ठ ॥ प्राप्तहोय तया अंगीं ॥ २२ ॥ श्लोक ॥
निष्कलंकं निरापेक्षं निर्दोषं निस्पृह स्तथा ॥ सत्य वाक्यं दया

शांति येतज्जंगम लक्षणं ॥ ६ ॥ टीका ॥ जंगमाचें मूळ गुण ॥ दोष
राहित म्हणून ॥ निराश जिंकिलेंमन ॥ धर्मीनिष्ठा असेत्याची ॥ २३ ॥
२ शंकरम्हणे पार्वती प्रति ॥ हेंसप्तगुण सदा वर्तती ॥ तोचि जंगम
कैलास पति ॥ सत्यजाण वराननें ॥ २४ ॥ वासना अपेक्षा सत्य वचन
॥ स्वधर्मी दया शांतिचें मंडन ॥ स्त्री विषय मानी वमन ॥ तोची
अधिकारी गुरुपदाचा ॥ २५ ॥ प्रपंच्यादि दोष समस्त ॥ तेथें नातळें
ज्याचें चित्त ॥ जोअल्प दोषाविरहित ॥ तों शुध्द जंगम जाणावा ॥
२६ ॥ प्राण जातअसतां संकटीं ॥ परी असत्य वाणी नवदे ओंठीं ॥
सदा सत्य वाक्यवाहें पोटीं ॥ श्रेष्टाचारा कारणें ॥ २७ ॥ परमार्थ
नांव ह्यास म्हणती ॥ सत्य मार्गा नसोडी कल्पांति ॥ देवादिक
लज्जित होती ॥ तयानरा देखोनी ॥ २८ ॥ शुध्ददुष्ठ संसर्गे करून ॥ २
जोव्यसनीं बध्द केला दीन ॥ तयाची इच्छा झाल्याजाण ॥ मुक्त करी
दुष्टातें ॥ २९ ॥ तयास दीन दया म्हणती ॥ परी मुक्त करून सोडती
॥ पुनर्भव जन्मा नचयेती ॥ दया तयेशी म्हणावें ॥ ३० ॥ स्वधर्माचा
कंटाळा ज्यास ॥ त्याचें ज्ञान भ्रष्ट विशेष ॥ नकरी भाषण सदा उदास

॥ शांती तया बोलीजे ॥ ३१ ॥ परधर्मी करी स्वधर्मनींदा ॥ मुग्ध न बसे करी संवादा ॥ स्व ज्ञाती अधर्म मतिमंदा ॥ शिक्षा करि सत्यपै ॥ ३२ ॥ काम क्रोध दंभ अहं कार ॥ असून शांतीचा बडीवार ॥ मिरवीं तो मूर्खचि साचार ॥ जंगम रूप नसेतेथें ॥ ३३ ॥ ऐसे शांत्यादि लक्षणें ॥ ज्यांच्या अंगीं वर्ते पूर्ण ॥ तोची जंगम सुजाण ॥ यरे ते वेशधारी ॥ ३४ ॥ सलक्षण जंगम शुध्द ॥ क्रियाचारें संस्कारेंबध्द ॥ तयाचें चरणीं प्रसिध्द ॥ तीर्थे नांदती अंनदें ॥ ३५ ॥ तोजिकडे पाहे स्वदृष्टीं ॥ तिकडे होय सुख सृष्टी ॥ निंदी तयाशी उठाउठी ॥ नर्क वास घडतसे ॥ ३६ ॥ श्लोक ॥ मुग्ध त्वं मूर्तिः मंतत्वं मद मोहादि वर्जतं ॥ माया देहमलं नास्ती तस्य जंगम लक्षणं ॥ ७ ॥ टीका ॥ मौनें करून सदा असणें ॥ अप शब्दातें स्वजिव्हेनें नच उच्चारी गेलिया प्राण ॥ मुग्धमौन येणेंची ॥ ३७ ॥ शुध्द शब्दाचार गोड ॥ बोलावें मधूर अशीरुढ ॥ ज्ञान विज्ञान तें महागूढ ॥ प्रगट करी भाविका ॥ ३८ ॥ विकार शब्द मुखा नाणी ॥ निदां कुचेष्ठा न ऐकें कानीं ॥ शिव लिंग मूर्ति सदा ध्यानीं ॥ असेंहें जंगम लक्षण ॥ ३९ ॥

३

तों जेंबोलें आज्ञा वचन ॥ तेंपाळिती भक्त उल्हासून ॥ स्वधर्मे चर्चेचें निरोपण ॥ करी नेमें प्रितीनें ॥ ४० ॥ श्लोक ॥ माता नास्ति पिता नास्ति नास्ति नाम कुलंतथा ॥ अयोनिः रूप निर्माणं तद्वंशं जंगमस्थलं ॥ ८ ॥ टीका ॥ जंगम स्थलाची ऐकाथोरी ॥ मातापिता नसे जन्मांतरीं ॥ अयोनि निर्मिला त्रिपुरारी ॥ जंगम वंशा लागुनी ॥ ४१ ॥ याचा पूर्ण महिमा जाण ॥ पहा शिखा मणिची खूण ॥ दुजें पाशुपत प्रमाण ॥ असेसत्य अवलोकी ॥ ४२ ॥ तेणें होयतें समाधान ॥ स्व धर्मी राहे अभिमान ॥ धर्मोप देशीकाचें मन ॥ आनंद पावें तेणेंची ॥ ४३ ॥ जो जंगम अभिमानीं प्रचंड ॥गुरु स्थला जाणें शोधीब्रंम्हांड ॥ तो मूळ स्थळाचा धरी दोर्दंड ॥ साह्य करी भवार्णवा ॥ ४४ ॥ भव उतरून जावया ॥ स्वधर्मी निष्ठा ठेविलिया ॥ तरी तयाच्या पूर्ण कार्या ॥ विघ्न बाधा नहोयपैं ॥ ४५ गुरु शास्त्रें असत्य मानितां ॥ तरी नर्क प्राप्ती होय तत्वता ॥ जंगम मूळ शोधूनि भजता ॥ क्रिया राहे अचूक तेथें ॥ ४६ ॥ क्रिये करितां शोधावें मूळ ॥ यरवीं नकारे वृथाछळ ॥ वेश पाहिल्या ३

तत्काळ ॥ उत्थापण द्यावें तया ॥ ४७ ॥ जोमान राखी जीव मात्रासी ॥ जो क्रिया भंगू नदे मानसीं ॥ तोची गुरु पुत्र अविनाशी ॥ पद पावेलसत्वर ४८ ॥ वेशधारी जंगम होती ॥ भ्रष्टाचारें ज्ञाती वर्तती ॥ तेउभयकुल नरका जाती ॥ अधर्मा भिमानें करूनिया ॥ ४९ ॥ (याकारितां) जंगम कुळीचा जंगमोत्तम ॥ तयाशि गुरु पदाचा नेम ॥ महेश्वर स्वमुखें सांगे सुक्ष्म ॥ तंत्रागमें वेळोवेळां ॥ ५० ॥

॥ श्लोक ॥ नवंशो जंगमस्तस्य शिष्य वर्गीणा जंगमः ॥ तत्कुलान्सत्पकान् शुद्धान् ॥ दद्यद्दीक्षा माहेश्वरी ॥ ९ ॥ जंगमस्य स्थलां तेतु कुलं जंगम यथाभवेत् ॥ तस्य माहेश्वरीं दीक्षा एक कुलेनशुध्द वान् ॥ १० ॥ सु स्वधर्में रतायाश्च पिता माता तथैवच ॥ रुद्र कुलं कुलीनांच सो गुरुस्थल मुच्यते ॥ ११ ॥

॥ टीका ॥ शंकर म्हणे हिमनग बाळा ॥ मीतुज निवेदीलें जंगम मूळा ॥ शुध्द जंगमाचाच पुतळा ॥ गुरुपदा श्रेष्ठ असे ॥ ५१ ॥ गुरुशेवेला योग्य शिष्य ॥ लिंगधारी स्वशाखें असे ॥ भक्ति भावें करी अनयासे ॥ पुण्यजोडें बहू तया ॥ ५२ ॥ त्यानें त्यजून संसार ॥ जंगम

वेश निर्धार ॥ जंगम शैवा करी फार ॥ अत्म हिता कारणें ॥ ५३ ॥
४ कोणी गादीस नवस करिती ॥ पुत्र झालीया गादीस अर्पिती ॥
त्याची दीक्षा करून सोडती ॥ शैवा धारी म्हणूनि ॥ ५४ ॥ शैवा
धारीस दीक्षा असणें ॥ हें तव शास्त्र अज्ञे प्रमाण ॥ परि त्यानें
पदारुढ होऊन ॥ गुरु पद घेऊंनये ॥ ५५ ॥ जरी गुरुपद घेकपटें
करून ॥ तरी तया कृतघ्नतां घडेजाण ॥ अधर्म म्हणती तया लागून
॥ विश्वास नधरी त्याचा ॥ ५६ ॥ तोआपण बुडून दुसऱ्या बुडवी ॥
स्वधर्माचा अभिमान सोडवी ॥ तेणें अधो गतीची पदवी ॥ मिळेल
सत्यपै ॥ ५७ ॥ याकरितां सत्शिष्य जाण ॥ सत्पकुळया शुध्द पाहून ॥
जंगम दिक्षातया लागून ॥ द्यावी सत्य उध्दारा ॥ ५८ ॥ जंगम कुली
चाचाशिष्य ॥ पदीं द्यावयास निर्दोष ॥ एककुल शुध्दविशेष ॥ माहेश्वर ४
पूज्य तोची ॥ ५९ ॥ स्वधर्माचे ठायीं रत ॥ माता पितरा सहित ॥
भूमी अवतार सत्य ॥ असे गुरुस्थळ जाणावें ॥ ६० ॥ गुरुस्थलाचें
महात्म्य ॥ पूर्वाध्यायीं शिवागमे ॥ वर्णिलेसे अनुपमे ॥ श्रोत्या लागीं
सादर ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ यत्पुनर्भवा न शुध्दान् न ग्राह्या संकरान्तथा ॥ प्रमादे प्राप्यते दीक्षा तत्त्याज्यश्वान वद्बुधैः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ माहेश्वरी दीक्षे कारणें ॥ सत्पकुळ्या विवाहित असणें ॥ तरीच जंगम दीक्षेते पावणें ॥ पुनर्विवाह मातावर्जे ॥ ६२ ॥ संकर ज्ञाती असतां ॥ तरी माहेश्वरादिक्षा नाहीं तत्वता ॥ चुकून दीक्षा प्राप्तहोता ॥ त्याचा त्यागच करावा ॥ ६३ ॥ जैसा श्वानाचास्पर्श पाही ॥ तैसा धरावा भ्रष्टदेही ॥ दीक्षा झालीम्हणून कांहीं ॥ शंका नधरावीतेथें ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ भस्माप धूल्यं शुचित्वं नमाणि भूषणं भवेत् ॥ विषयां शिक्षितं दंडं धारये ल्लक्षणंगुरुः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ गुरुस्थला पासून जन्म ॥ ज्यास क्रियचा नित्यनेम ॥ तोस्वधर्माचा धरिप्रेम ॥ पूर्व वोघाकारणें ॥ ६५ ॥ नेमें करी त्रिकाल स्नान ॥ तैसेच ही भस्म धूलन ॥ नस्वीकारी मणी भूषण ॥ सदा कर्मी पवित्र तो ॥ ६६ ॥ विषय वासनां दंडावया ॥ कोपिन पादूका गुरुवर्या ॥ शोभे मेखळांती भव्य काया ॥ पावन पवित्र शोभतसे ॥ ६७

निर्मत्सर वासना पाहीं ॥ भरंवसा नधरी दुष्ट देहीं ॥ सावधराहून दुजा सही ॥ संकटीं कदां पडूं नेदी ॥ ६८ ॥ विषया दिक मोहाचे हानन ॥ करावया केला दंड धारण ॥ अपवित्र मानी रत्न भूषण ॥ भस्म कुंठन प्रीयतया ॥ ६९ ॥ तोची जंगमगुरु साचार ॥ तया असो साष्टांग नमस्कार ॥ सद्गदून करीती जयजय कार ॥ नेत्रीं प्रेमाश्रू ढाळीती ॥ ७० ॥ श्लोक ॥रूपा रूप समा स्त्यातं ॥ काम निष्काम मेवच ॥ पंचक्षरः जपासक्तो ॥ यतज्जगम लक्षणं ॥ १३ ॥

॥ टीका ॥ जोरूप असून अरूप ॥ तयाम्हणती ब्रम्हरूप ॥ जोविकार रहित चिद्रूप ॥ निष्कामें वर्तेसदा ॥ ७१ ॥ पंचाक्षरीचा जप मुखीं ॥ विदेह स्थितीवर्ते सुखी ॥ लिंग पूजा निष्ठाएकीं ॥ दुजी न अवलोकीतो ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ शिवभक्तानां गृहे स्याध्दन भुक्तिः प्रातिगृहं ॥ स्वज्ञातीभिः स्वं संस्कारः कर्तव्य गुरुहस्तके ॥ १४ ॥

॥ टीका ॥ वीरशैवाचिये मंदिरीं ॥ सदा रहावें सुखांतरीं ॥ भोजनोत्तरध्नन करीं ॥ आणून अर्पि आनंदें ॥ ७३ ॥ त्याचा करावा

स्विकार ॥ तैसीच दानें वारं वार ॥ शिव योगादि साचार ॥ गुरु लागीं आर्पीतीं ॥ ७४ ॥ वीर शैवाचें संस्कार ॥ गर्भादि अंत कालापर ॥ लिंग धारीनें सत्वर ॥ गुरु हस्तें करवावें ॥ ७५ ॥ गुरु तोची असे देख ॥ उप गुरुचा वंशक ॥ तया हस्तेंहें मांत्रिक ॥ क्रिया करावी शास्त्राज्ञा ॥ ७६ ॥ शिवा चारासी जंगम गुरु ॥ ऐसा आगम गर्जे मेरु॥ तोच करील भवपारू ॥ वीरशैवा लागूनि ॥ ७७ ॥

॥ श्लोक अन्यार्पित नकर्तव्य कर्तव्यं जंगमार्पितं ॥ लिंग जंगम समा युक्तं तज्जंगम विशेषतः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ स्वज्ञाती आणि जंगम पंक्ती ॥ उल्हासे कराव्या यथा-शक्ति ॥ संकल्पें अर्पूण जंगम मूर्ति ॥ तृप्त करीअत्यादरें ॥ ७८ ॥

॥ श्लोक ॥ यस्य गुरु दीक्षानास्ति नास्तिदीक्षा कुलं तथा ॥ तेदेव स्थावरंलिंगः पूज्यति सादरैः भवी ॥ १६ ॥

॥ टीका ॥ जयासी दीक्षा संस्कार ॥ नाहीं त्यानें पूजावें स्थावर ॥ ज्याचे हृदस्थळीं शंकर ॥ त्यानें स्थावर पूजूं नये ॥ ७९ ॥ अमान्य करून हृदयींचे लिंग ॥ जो स्थावरीं धरी भक्तिअंग ॥ तो शिवभक्त

नोव्हे सांग ॥ सोंग वेशधारी जाणावा ॥ ८० ॥ लिंग लोळतसे उरा खालीं ॥ अन्य स्थावरा दंडवत घाली ॥ त्याचें मुख देखतां अंघोळी ॥ वस्त्रा सहित कीजे ॥ ८१ ॥ गळां असून शिव त्रिनयन ॥ जोकरी अन्य देवउपासन ॥ तो भवीहुनी परता जाण ॥ लिंगीनिष्टा नसेज्याची ॥ ८२ ॥ यालागीं लिंगीं निष्ठा धरिजे ॥ जंगम ही तद्रूप मानिजे ॥ जंगम मुखें लिंग तृप्त करिजे ॥ तेणें संतोषें शंकर ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ निरा कारंच साकारं निर्विकारं सुखा वहं ॥ साक्षान्मुक्ति पदं भाव मुत्तमं जंगमस्थलं ॥ १७ ॥ ॥ टीका ॥ जंगमस्थल तें निराकार ॥ तेंचीझालें असें साकार ॥ आकार स्थितीचा देह ओं कार ॥ षड्विकार विरहित ॥ ८४ ॥ तोअगम्य अगोचर अनाम ॥ अलक्षआपार अनुपम ॥ निःप्रपंच निरामय निसीम ॥ निःपाप निर्वैर सर्वाभूती ॥ ८५ निराश निश्वास निराभास ॥ निर्गम निजानंद विशेष ॥ निर्मल निश्चल तो निर्दोष ॥ निरंजन मूर्ति जंगम ॥ ८६ ॥ ऐसा जंगमतो शिवमूर्ति ॥ निराभास असे शास्त्रमिती ॥ ढळेना स्वधर्मा कल्पांती ॥ शिवरूप म्हणू नियां ॥ ८७ ॥ इ० जंगम मा० पर० ॥ निवेदिले अ० दश० ॥ छ ॥ छ ॥

दशम समाप्त

॥ श्री महादेवाय नमः ॥ श्रीॐकाराय नमः ॥ मागील अध्यायीं जंगम महात्म ॥ वर्णीलें सांग श्रीपरमात्में ॥ स्व रहस्य याग्रंथीं अत्युत्तमें ॥ विशेष करून वर्णिलें ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ देव्यु वाच ॥ किंमेदं नाद रूपंच किं बिंदु तथैवच ॥
कलारूप मिदं भेद ब्रूहीमे परमेश्वर ॥ १ ॥

॥ टीका ॥ पार्व ती म्हणें देवाधीदेवा ॥ नाद रूपाचा भेद निरोपावा ॥ बिंदु भेद तोही दाखवावा ॥ कळारूप तें कोण कैसी ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ नाद गुरुमुखं चैव बिंदु लिंग मुखंतथा ॥
कलाचार मुखं ज्ञात्वा विज्ञानं मुख मोक्षदं ॥ २ ॥

॥ टीका ॥ ईश्वर म्हणे पार्वती प्रती ॥ ऐक नाद व बिंदुची स्थिती ॥ सुक्षम म्हणती जया प्रती ॥ तेचि तुज निवेदितो ॥ ३ ॥ नाद तो जाणावा शद्ब ॥ तयाचें स्थान द्युः शुध्द ॥ गुरुत्वास तो प्रसिध्द ॥ आला असे जाणपा ॥ ४ ॥ म्हणूनि नाद गुरुच म्हणती ॥ योगी योग्यासंकेतें जाणविती ॥ अंतरीं आनंदें पोतीभरती ॥ मापें देतीहर्षूनिया ॥ ५ ॥ बिंदु चा कैसा विचारअसे ॥ तोही सदा लिंग रूपभासे ॥

लिंगतो परब्रह्मरूपीं वसे ॥ ह्मणूनि बिंदु ह्मणती तया ॥ ६ ॥ कला
१ जाणावी आचाराचें पोटीं ॥ आचार नीती स्वधर्माची काटी ॥ तेणें तरू-
निजातसे शेवटीं ॥ मोक्षा लागीं निश्चयें ॥ ७ ॥ ऐसा कलेचा महिमा ॥
शिव सांगे ऐके उमा ॥ प्रश्नोत्तराची हीसिमा ॥ मुखानें नवदवें ॥ ८ ॥
यास्तव नाद बिंदु कला तिन्ही ॥ गुरु लिंग जंगमा अभिमानी ॥
ज्याचें प्रसाद फला संतोषूनि ॥ तत्वें शोधिली धर्माची ॥ ९ ॥ तोची
प्रसादी माहा ज्ञानी ॥ अज्ञानांधा होय तरणी ॥ जयाचें संसर्गें क-
रूनि ॥ ज्ञान होय मूढजना ॥ १० ॥ प्रसादी ह्मणावें कोणासी ॥
गुरु लिंग व जंगमासी ॥ ऐक्य भाऊनी मानसीं ॥ वर्ते निर मत्सरीं सदां
॥ ११ ॥ अशा ह्या नाद बिंदुकळा ॥ प्रसादी मिळाल्या सकळा ॥
रिद्धि सिद्धिचा पूर्णमेळ ॥ प्राप्त होय प्रसादिका ॥ १२ ॥ जे प्रसादिक १
होऊं इछिती ॥ त्यानीं शरण जावें गुरू प्रती ॥ पाहू नियात्याची आचार
शक्ती ॥ स्वशील द्यावें आवडीनें ॥ १३ ॥ शील चालविण्या करितां ॥
कुठूंबाची श्रद्धा तत्वता ॥ स्वधर्माभि मानें वर्तता ॥ क्रिया राहे सतेजपै
॥ १४ ॥ क्रियाचारे जो तेजः पुंज ॥ तया नमिती द्विज राज ॥ तपश्चर्यचें

मूळ बीज ॥ थोरीजाण क्रियची ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ देव्यु वाच ॥ इष्टलिंग मुखं किंवा प्राण लिंग मूखंतथा
॥ भावलिंग कथं भेद ब्रूह्मे परमेश्वर ॥ ३ ॥

॥ टीका ॥ पार्वती ह्मणे सदाशिवा ॥ इष्ट लिंगाची मुखे दाखवा ॥ भाव लिंगी प्राण आर्पावा ॥ हे पूर्वि कथीलेसे ॥ १६ ॥ तरीह्याची वद्नेकिती ॥ तीं सागांवी मजप्रती ॥ तरी मी धन्य जगती ॥ होय सत्य स्वामिया ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ इश्वरो वाच ॥ इष्ट लिंगमुखं पंचप्राण लिंग स्याच्चिन्मुखं
॥ यतन्मुख मिदं चैव भाव लिंग मुखं तथा ॥ ४ ॥

॥ टीका ॥ शंकर ह्मणे हे गौरी ॥ मीच वसें लिंगांतरीं ॥ पंच वक्त्रे निर्धारी ॥ असती इष्ट लिंगापै ॥ १८ ॥ इष्ठ लिंगाची जी वद्ने ॥ तींच प्राण वायुचीखूण ॥ पांचच असती प्रमाण ॥ प्राण लिंगा जाणावया ॥ १९ ॥ भाव लिंग भक्ति अंग ॥ तया नसे अनु भोग ॥ इछित कल्पना सांग ॥ भाव लिंगीं वसत ॥ २० ॥ लिंग एकची असे इष्ठ ॥ प्राण लिंगीं अर्पीता श्रेष्ठ ॥ भावहाताये वरीष्ठ ॥

हेंची त्रिविध जाणावें ॥ २१ ॥ त्रिविध जाणे जोकरी पूजा ॥ तेणें संतोष वृषभ ध्वजा ॥ होतसे अनयासें गीरीजा ॥ लिंग पूजा श्रेष्ठही ॥ २२ ॥ ॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ अष्ट विधार्चनं कुर्यादिष्ट लिंगस्य पूजनं ॥ तल्लिंगं मनोलयातु प्राण लिंगस्य पूजनं ॥ ५ ॥

॥ टीका ॥ ऐकइष्ठ लिंगाचें पूजन ॥ धूपदीप अष्ठविधार्चन ॥ नैवेद्य तांबूलादी अर्पण ॥ इष्ट लिंगासी अर्पिणें ॥ २३ ॥ बरवा त्रिकाल साधून ॥ गुरुरूप भावना भाऊन ॥ शोडशोपचारें करून ॥ लिंगासी पूजीजे ॥ २४ ॥ पूजाअंती वाद्य ध्वनी ॥ घंटा चामर व्यजनीं ॥ भक्तिभावें सद्गदूनी ॥ लिंगार्चन करीतसे ॥ २५ ॥ प्राण लिंगाची तीपूजा कैशी ॥ ध्यानधारणा गुरु लिंगासी ॥ गुरुच लिंग मानसी ॥ तोची गुरुभक्त जाणावा ॥ २६ ॥ गुरुलिंग तोचि प्राण लिंग ॥ सर्वविनटला लिंगअंग ॥ त्याचीपूजाघडे यथासांग ॥ तीच प्राणलिंग पूजा ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ मनोलयं निरंजनं भावलिंगस्यपूजनं ॥ यतल्लिंगार्चनं ज्ञानं विशेष श्रुणूपार्वती ॥ ६ ॥

॥ टीका ॥ मन अचारीं लीन होऊन ॥ जोकरी इष्ट लिंग पूजा जाण ॥ परी मीपूजीतो हा अभिमान ॥ मना न अणी कल्पांती ॥ २८ मनोलय पूजेआंती ॥ भाव लिंगाची होय प्राप्ती ॥ तेथें ध्याता विज्ञान हार्ती ॥ लाभतसे सर्व जीवा ॥ २९ ॥ जोनित्य करी भावलिंग पूजा ॥ तेणें वश्य केला कैलास राजा ॥ स्वधर्माचा पाया समूळ बीजा ॥ आधिकारी होयतो ॥ ३० ॥ भाव लिंग हेच भक्तिअंग ॥ विश्वमय असे त्याचावेग ॥ जीव मात्रीं हेंतत्ववसें सांग ॥ ह्मणूनीच धर्म भीती ॥ ३१ ॥ जयाची भावभक्ती निमाली ॥ तुच्छ वाटूनबुद्धि फाकली ॥ त्याचे धर्मास भ्रष्टताआली ॥ हें सांगणें कासया ॥ ३२ ॥ जोधर्म घातकी होय तर्कटी पूर्ण ॥ त्याचे धर्मज्ञानें न पहावें वदन ॥ नकरी पंक्तीसमागमें भोजन ॥ दुष्टा शासन हेंचीपै ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ इष्ट लिंगार्पितं किंवा प्राण लिंगार्पितं यथा ॥ भाव लिंगार्पितं तत्वं ब्रूहिमे परमेश्वर ॥ ७ ॥

॥ टीका ॥ पार्वती ह्मणे लिंगमूर्ति ॥ इष्टलिंगा कवण प्रीति ॥ तैसीच प्राण लिंगतृप्ति ॥ सांगामज जगदेश्वरा ॥ ३४ ॥ भावलिं-

गाची पूर्ण स्थिती ॥ तृप्तिहोय कवण्या अर्थीं ॥ हेंज्ञान मज पशुपती ॥
३ श्रुतकरी आदरें ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरुवाच ॥ इष्ठ लिंगार्पितं अंगं प्राणालिंगार्पितं मनः ॥ भाव लिंगार्पितं तृप्ति रिति सत्य वरानने ॥ ८ ॥

॥ टीका ॥ देहहा इष्ठ लिंगार्पित असे ॥ इष्ठ देहीं इष्ठलिंगवसे ॥ अनइष्ठ देहीं नवसे ॥ अलिंगी जाण बोलती त्या ॥ ३६ ॥ इष्ठलिंग वरि शैवासी ॥ त्यानें आर्पिलें शरीरासी ॥ प्राणलिंगा अर्पि मानसी ॥ तृप्ति जाण भावलिंगा ॥ ३७ ॥ लिंगधारी माहा योगी ॥ जेविनटले भावलिंगीं ॥ तयाची अहंता इच्छाजगीं ॥ नवर्ते कालत्रयीं ॥ ३८ ॥ हेंअसे भेद चर लिंगाचे ॥ दुजे स्थावर बोलती वाचें ॥ तयाचे भेदाभेद ऐकताच ॥ विस्मिय वांटें मानसीं ॥ ३९ ॥ ३
चर स्थापना दैवतास ॥ नसे तेअंश स्थावरास ॥ सिंव्हनाद ध्वनी विशेष ॥ तेचर लिंगजाणावें ॥ ४० ॥ ज्याज्याकालीं धर्महानी ॥ शिव भक्तिउछेदुनी ॥ वीरशैव मार्गालागुनी ॥ बुडविती वेळावेळा ॥४१ ॥ त्याची करावया स्थापना ॥ आच्यार्य गूरुरूपी जाणा ॥ ज्या भूलिंगां

तून गर्जना ॥ तीचर लिंगे मानावी ॥ ४२ ॥ जेथून आच्यार्य प्रग-
टले ॥ तेंस्थान स्वयंभू निवेदिलें ॥ स्वयंभवागमींहेंवर्णिले ॥ सृष्टिउद्भवा
कारणें ॥ ४३ ॥ हेआच्यार्य पांच असती ॥ अवतारीं विशेष
शक्ति ॥ ब्रह्म देवाआदि निर्मिती ॥ मृत्युसृष्टि जाणते ॥ ४४ ॥ तेज्या
स्थानीं गुप्त होती ॥ तीं स्थलें पवित्र असती ॥ तीर्थे तयासच ह्मण
ती ॥ शिव स्थानालागूनी ॥ ४५ ॥ त्यालिंगास चरलिंग ॥ मानावें
सत्य शास्त्रांग ॥ वीरशैव आचार भंग ॥ येणें नोव्हे कल्पांती ॥ ४६ ॥
जीलिंगे चर असती ॥ तेथें मनुष्याची वस्ती ॥ अखंड राहे सद्ग
ती ॥ शिवस्मरणीं तत्पर ॥ ४७ ॥ वीर शैव धर्माचे मुख्यतत्व ॥ शिवा
वांचून इतर दैवत ॥ नमानावें श्रेष्ट आद्भूत ॥ एक शिव सर्वकर्ता ॥
४८ ॥ ज्या लिंगास ईश्वर प्रसिद्ध नाम ॥ तीती जाणावी चरलिंगे
उत्तम ॥वंद्यअसे श्रीशैल्य आच्यार्यग्राम ॥ वीरशैवें जाणावें ॥ ४९ ॥
चरलिंगे स्थिर होती ॥ तया स्थावर बोलती ॥ कालांतरें प्रगटती ॥
धर्महानी झालीया ॥ ५० ॥ तया स्थावरासी वंदावें ॥ भक्तिभावें
अर्चवावें ॥ प्रसिद्धपणें पुढें व्हावें ॥ लिंग महात्म वाढवा वया ॥ ५१ ॥

अरण्य स्थानीं उदास ॥ स्थापित लिंग विशेष ॥ अर्चती जया तापस
४ ॥ चर लिंगच तेही ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ महालिंग मिदं देवी मनातीत मगोचरं ॥ निर्मलं निर्गुणं नित्यं निरंजन निरामयं ॥ ९ ॥

॥ टीका ॥ पूर्वि जीजी लिंगे कथिली ॥ सहा संखेनें दाखविली ॥ एकएकां पासूनी झाली ॥ लिंगेजाण अंनत ॥ ५३ ॥ सर्व लिंगास अधार ॥ महा लिंगहोय प्रकार ॥ तयापासून ॐकार ॥ प्राप्तहोय योगीया ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ महालिंगमाख्यातं प्रसादलिंग समुद्भवः ॥ प्रसादा- जंगमस्तस्य चरलिंगाविदुविदु: ॥ १० ॥

॥ टीका ॥ महालिंगाचे ठायीं उत्पन्न ॥ प्रसादहें लिंग प्रगटून ॥ ४
तयापासून जंगमजाण ॥ अवतरती युगायुगीं ॥ ५५ ॥ तया नामासी चरलिंगे ॥ बोलती वीरशैवमार्गें ॥ वेद जाणती अनुरागे ॥ चर लिंगावंदीती ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ जंगम लिंगात्शिवलिंगः गुरुलिंगतथैवच ॥ गुरुलिंगे

समोद्भव आचारलिंगेतिस्मरेत् ॥ ११ ॥



॥ टीका ॥ जंगमलिंगा पासून शिवलिंग ॥ उत्पन्नझालें पृथ्वीदिव्यअंग ॥ तयायोगेंकरूनिया पृथ्वीलिंग ॥ ह्मणती जाण ज्ञातेपै ॥ ५७ ॥ शिव लिंगापासून गुरु ॥ प्रगट होय शास्त्राधारु ॥ तयापासूनि याआचारु ॥ प्रगट झालाजगीं ॥ ५८ ॥ ऐसिही षट् लिंगोत्पत्ति ॥ तुज निवेदिली पार्वती ॥ यासर्वा भूती माझीस्थिती ॥ सर्वकाल भरलीसे ॥ ५९ ॥ आतां लय सांगतो तुज ॥ आचार महालिंगबीज ॥ हेंउत्पत्ती लयाचें काज ॥ करितीजाण परस्परे ॥ ६० ॥ महालिंगहेमूळ बीजात ॥ अलिप्त कल्पकोटि पर्यंत ॥ ॐकारब्रह्म आवतारत ॥ पंचप्राण तत्वरूपीं ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ प्राणअचारं लिंगस्य गुरुलिंग भवेत्खलु ॥ गुरुलिंगस्य तुप्राण शिवलिंग भवेत्तथा ॥ १२ ॥ शिवलिंगत्वं जीवस्थ जंगम लिंग एवच ॥ प्राण जंगमलिंगस्य प्रसादोलिंग उच्यते ॥ १३ ॥

॥ टीका ॥ आचार लिंगाचा प्राण ॥ गुरुलिंग असेंजाण ॥ तयाचा महिमापूर्ण ॥ पूर्वाध्यायीं वर्णीला ॥ ६२ ॥ गुरुलिंगाची

जीवनकळा ॥ शिवलिंग हिमनगबाळा ॥ तुज निवेदिलें वेळोवेळां ॥
५ सृष्टिउद्धारा कारणें ॥ ६३ ॥ शिवलिंगासी प्राण संचार ॥ जंगम
लिंगाचे ऐक्यफार ॥ जंगमा न विसंबे शंकर ॥ प्राणमाझा ह्मणू-
निया ॥ ६४ ॥ जंगमाशीं मंत्रप्राण ॥ तयाजाणावे अवरण ॥
जीवित्वाची मुख्य खूण ॥ प्रसादलिंग बोलिलें ॥ ६५ ॥ प्रसाद
लिंगाची ऐक्यता ॥ महाप्राणालिंग तत्वता ॥ येणें चुकतेभव वेथा ॥
स्व स्वरूपीं निमग्न ॥ ६६ ॥ महालिंगापासून उद्भवलें ॥ पुन्हा
महालिंगीं लयांपावलें ॥ असेहेंसहा प्रकार वहिलें ॥ एक लिंगा
पासूनीया ॥ ६७ ॥ महा लिंगाचें बीजाकार ॥ ॐकाररूपीं निर्वि-
कार ॥ स्मृतिहोता स्फूर्ती विकार ॥ ध्वनत्कार होतअसे ॥ ६८ ॥
ऐसाहा षड्गुण ऐश्वर्य संपन्न ॥ एकशिवच परमपावन ॥ तयावा- ५
चून महाप्रळयांतून ॥ कोणी नरहाती देवादिक ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ लिंगार्चनंतुयः कुर्यात् इष्टलिंग समाश्रुतं ॥ यथा
लिंगमाख्यातं षड् लिंगस्यफलंभवेत् ॥ १४ ॥

॥ टीका ॥ शिवपूजा करावया कारणें ॥ भक्तिभावें देहाप्रतिपाळणें ॥

इष्टहेतु विरुढोन तुष्टहोणें ॥ इष्टलिंगे करूनिया ॥ ७० ॥

॥ श्लोक ॥ पार्वत्युवाच ॥ किंवर्ण इष्टलिंगश्च कलाकिमार्चनंतथा ॥ ज्ञातीभिर्पुत्र दाराद्यैः कोवास्थाने प्रतिष्टितः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ पार्वती ह्मणे महेशा ॥ मजसांगा इष्टभाषा ॥ सत्य तुटें भवपाशा ॥ पुनर्जन्म नयेची ॥ ७१ ॥ यास्तव इष्टलिंग वर्णेकोण ॥ कवण्याकाळीं अर्चावें जाण ॥ तयाचें व्हावें निरोपण ॥ प्राण वल्लभामजलागी ॥ ७२ ॥ आणिक जया वर्णाप्रति ॥ इष्टलिंगाची असेप्राप्ती ॥ पुत्रदारा सह वर्तती ॥ स्थान वर्ण निवेदी ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ महालिंगमिदंदेवी प्रसादः लिंग मेवच ॥ ततोजंगम लिंगश्च शिवालिंग तथैवच ॥ १६ ॥ गुरूलिंग यथाचैव आचारलिंग समुद्भवः ॥ एकैक प्राण मास्यात मेकैकंतु समन्वितं ॥ १७ ॥

॥ टीका ॥ शंकरह्मणे पार्वती ऐक ॥ हीलिंगोत्पत्तीची स्थानें देख ॥ ज्यामहा लिंगापासून एक ॥ प्रसाद लिंगउद्भवले ॥ ७४ ॥ प्रसादापासून जंगम ॥ जंगमापासून उत्तम ॥ इष्टशिवलिंक अनाम ॥

उद्भवले जाणदेवी ॥ ७५ ॥ शिवलिंगाची प्राप्तीहोता ॥ गुरुलिंगाची
६ प्रसिद्धता ॥ सिंव्हावलोकनें पहता ॥ पदराहे अचलतें ॥ ७६ ॥
गुरुलिंगींअसे आचारावरण ॥ प्रगटहोय वीरशैवा लागून ॥ भावीका-
स आचार लिंगाचीखूण ॥ सोपीअसें जाणही ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ उत्तमांगे गले वापिकंठे वक्षस्थले पिवा ॥ तथाहस्त
तलेवापि प्राणलिंगः धारयत्सुद्धिः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ लिंगधारणे चींस्थानें ॥ सांगावयस कारणें ॥ मस्तकींकंठीं
असणें ॥ सदालिंग हृदयीं ॥ ७८ ॥ नाभिचें खालींलिंग येता ॥ दोष
घडेतया तत्वता ॥ देहयाचेभिन्न करितां ॥ प्रायश्चित घेणेंपै ॥ ७९ ॥
त्रिकाळ करावें अर्चन ॥ भावें बिल्वदळीं पूजन ॥ प्राणलिंग तोच जा-
णून ॥ इष्टलिंगा भजावें ॥ ८० ॥ ॥ श्लोक ॥ सएवशंकरःसाक्षात् ६
पिनाकी नीललोहितः ॥ यः शंकराश्रितः सर्वेमुचंतेव नसंशयः ॥ १९

॥ टीका ॥ इष्टलिंग नीलवर्ण ॥ पूजालागीं योग्यजाण ॥ त्याप्रति क-
राजतन ॥ वविशैव धर्मीया ॥ ८१ ॥

॥ श्लोक ॥ भावादि त्रिषुलिंगेषु जगत्सृष्ठ्या दिकारणं ॥ एकैकंच

द्ययोजातं नवलिंगसमुद्भवं ॥ २० ॥

॥ टीक ॥ सृष्टि तरावया निश्चिती ॥ हेआवतार लिंगमूर्ति ॥ एकापासून नवहोती ॥ लिंगजाण ममप्रीये ॥ ८२ ॥ एकापासून दोनदोन ॥ आवतारे सहाजाण ॥ तयाचें सागतों महिमान ॥ मुख्यत्रय लिंगाचें ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ आचारंगुरुलिंगंच इष्टलिंगेषुजायते ॥ शिवलिंगंच जंगमंच प्राणलिंगेषुजायते ॥ २१ ॥ प्रसादंच महालिंगं भावलिंगे षुजायते ॥ इत्येते नवलिंगानि ज्ञातव्यंचवरानने ॥ २२ ॥

॥ टीका ॥ आचार लिंग आणिगुरूस ॥ इष्टलिंगाचेटायीं विशेष ॥ भक्तिआचरावीती निर्दोष ॥ वीरशैव धार्मिकांनीं ॥ ८४ ॥ इष्टलिंगाचे ठायींप्राण ॥ शिवलिंग जंगमींजाण ॥ प्राणलिंगाची आठवण ॥ करूनरहावें भूलोकीं ॥ ८५ ॥ प्रसादलिंग महालिंग ॥ याचेदैवत भावलिंग ॥ सर्वशक्तिचें प्राप्तअंग ॥ गुरुकृपें वोळखावें ॥ ८६ ॥ इष्ट प्राण भावहींनावें ॥ अर्चलिंगास अनुपमें ॥ असतीं जाण वेदांतोत्तमें ॥ लिंगधारी भाविका ॥ ८७ ॥ सर्वपूजेचें सार

प्रसिद्ध ॥ एकलिंगपूजा फलअगाध ॥ शिवागमीं वर्णिलें विविध ॥
७ विष्णवादि देवानीं ॥ ८८ ॥ लिंगपूजेनें तापशी ॥ नामपावलें
ब्रह्मर्षी ॥ ब्रह्म विचार मानसीं ॥ योग्यहोती शिवकृपें ॥ ८९ ॥
ऐसीजी लिंगपूजा श्रेष्ट ॥ पिंडीं ब्रह्मांडींही बलिष्ट ॥ तेथेंनसें कदां
अनिष्ट ॥ ग्रहदशा जाणपा ॥ ९० ॥ शिवसांगें भवानी प्रति ॥
भाह्मेधारण जेकारिती ॥ तयानसें अधोगती ॥ पवित्र कैलास प्राप्त-
होय ॥ ९१ ॥ इतिलिंगोत्पत्ती लय ॥ तुजश्रुतकेला हिमालय ॥
बहुसुरस पुढीलाध्याय ॥ वदाह्मणे पार्वती ॥ ९२ ॥ इतिश्री परम-
रहस्य सारामृत ॥ उमामहेश्वर संवादीं वर्तत ॥ त्याची टीका
करूनिया प्राकृत ॥ कृत कृत मन्मथ ॥ ९३ ॥ इति एकादशमोध्याः
॥ श्री सांब सदा शिवार्पण मस्तु ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ ७

॥ श्री ॐकाराय नमः ॥ श्री आघोर रूपाय नमः ॥ एकादश अध्यायीं लिंग विचार ॥ सांगीतला नवलिंग भेदाकार ॥ तैसाच मिश्रप्रकारें सविस्तर ॥ श्रुत करून आनंदवी ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ किंमिश्रितेव आचारः तदर्थ गुरु लिंगयोः ॥ शिवलिंगश्च किं मिश्र तस्यजंगम लिंगयोः ॥ १ ॥ प्रसाद लिंगप्रणितं महालिंग तथैवच ॥ इत्येव मिश्रतं भावं श्रुतुमिच्छमी सादर ॥ २ ॥

॥ टीका ॥ पार्वती ह्मणे शंकराशी ॥ कवण लिंग कवणाशी ॥ मिश्रीतअसे तत्वांशी ॥ सांगा मज स्वामीया ॥ २ ॥ आचारलिंग कवणा मिश्रीत ॥ तैसे गुरुलिंगाची कैशीमात ॥ शिवलिंग कोटें अलिप्त होत ॥ तैमज निवेदावें ॥ ३ ॥ जंगमलिंग प्रसाद नेम ॥ आहे परिपूर्ण निजधाम ॥ प्रत्यक मिश्रतेंकायकाम ॥ सांगा-मज स्वामीया ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ आचार गुरुलिंगश्च शिवलिंगश्च जंगमः ॥ प्रसाद महालिंगश्च एकैकातु सुमिश्रितं ॥ ३ ॥

॥ टीका ॥ शिव ह्मणे अंबेप्रती ॥ मिश्र लिंगाची कैशी व्याप्ती ॥ उभयलिंगे ऐक्य सामावती ॥ तो मिश्रभाव जाणावा ॥ ५ ॥ आचार लिंगामिश्रीत गुरु ॥ गुरुमिश्र शिवलिंगीं निर्धारु ॥ शिवलिंगवसे जंगमाकारु ॥ प्रसाद लिंग महालिंगीं ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ ज्ञानं बीजाक्षरं किंवा आचारस्य कथं भवेत् ॥ गुरुलिंगस्य किंबीजं शिवलिंगस्य तद्वद ॥ ४ ॥ जंगमस्य कथंबीजं प्रसादे वदसादरैः ॥ यतेबीजा क्षरंचैव कथमाद्य ममप्रति ॥ ५

॥ टीका ॥ पार्वती ह्मणेहेउमापते ॥ महालिंगाचें बीज कोणते ॥ आचार गुरु जेह्मणविते ॥ बीज केवि सागांमज ॥ ७ ॥ शिवलिंग जंगमलिंग ॥ यांची सांगा बीज अंग ॥ प्रसादाचा हीप्रयोग ॥ सांगामज स्वामिया ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरो वाच ॥ ज्ञानं प्रणव बीजंच आचारस्य नकारकं ॥ मकारंच गुरोबीजं शिकारं लिंगमूर्तिकं ॥ ६ ॥ वकारं जगमं बीजं यकारंच प्रसादकं ॥ इत्यतैव महाबिजं महामंत्रोत्तमोत्तमं ॥ ७ ॥

 

॥ टीका ॥ पार्वती प्रति निरोपीशंकर ॥ महालिंगाप्रती बीज ॐकार ॥ आचार लिंगाकारणें नकार ॥ गुरुलिंगा मकारपै ॥ ९ ॥ शिवलिंगाशी शिकार बीज ॥ जंगमालिंगीं वकार गर्जे ॥ प्रसाद लिंगीयकार काज ॥ असेजाण पार्वती ॥ १० ॥ हा नमःशिवाय पंचाक्षरी ॥ प्रणवा सहित षडाक्षरी ॥ पंचतत्वाचा अधिकारी ॥ लयोत्पत्ती कर्ताजो ॥ ११

॥ श्लोक ॥ पार्वत्युवाच ॥ षट्स्थलं कथं नाम षट्स्थलं कथं रूपं ॥ ममप्रतिकथं स्वामिन् गुप्त रहस्यैव ज्ञानं ॥ १० ॥

॥ टीका ॥ पार्वती ह्मणे देवाधिदेवा ॥ षट्स्थलांचिं नांवें दाखवा ॥ तैसेच त्याचें रूप कळवा ॥ कृपाळू होऊनि ॥ १२ ॥ हेषट्स्थल गुप्त रहस्य ॥ मज सांगा ज्ञानप्रकाश ॥ योग क्रियाअसे विशेष ॥ रहस्यांगीं ह्मणूनिया ॥ १३ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरो वाच ॥ प्रसादीं प्राण लिंगानाम भक्तःमाहेश्वरस्तथा ॥ शरण्यैक्य स्थलंभेद षट्स्थलानां प्रथक् प्रथक् ॥ ११ ॥

॥ टीका ॥ ईश्वर ह्मणे जगदेश्वरी ऐक ॥ प्रथम भक्तिस्थळ

२

सुखदायक ॥ दुजेतें माहेश्वर भवहारक ॥ प्राण वल्लभें जाणावें ॥ १४
तिसरेंस्थल प्रसादीह्मणती ॥ चवथें प्राणलिंग स्थापिती ॥ पांचवें
शरण वोळखिती ॥ साहाव्या जाणती ऐक्यतें ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ पार्वत्यु वाच ॥ भक्तो माहेश्वर श्चैव प्रसादी प्राण
लिंगकः ॥ शरणः शिवलिंगैक्य षट्स्थलं कथंभवेत् ॥ १२ ॥

॥ टीका ॥ पार्वती प्रश्नकरी शंकराशी ॥ कोणताआचार कोण्या
स्थळाशी ॥ हेसांगावें जगत्पाला मजशी ॥ जगउद्धारा कारणें ॥ १६

॥ श्लोक ॥ ईश्वरो वाच ॥ सदाचार शिवभक्तिः लिंग जंगमे-
कधीः ॥ लांछनेन शरण्यश्च भक्तिस्स्थल मुत्तमं ॥ १४ ॥

॥ टीका ॥ शिवसांगे आंबेप्रति ॥ षट्स्थळे सांगूनिश्चिती ॥
भक्तिस्थळ तुझेचित्तीं ॥ प्रथम श्रवणपै ॥ १७ ॥ जरी कोटि २
लाभजोडे ॥ तरीन भुलावें रोकडे ॥ सदाचार धर्माकडे ॥ निष्ठा ठेवी
एकनिष्ठ ॥ १८ ॥ शिवधर्म शास्त्राचें उलंघन ॥ कधीं न करावें
गेलीयाप्राण ॥ जोशिवाचारी अत्यंत गढून ॥ उपदेशी वीरशैवा ॥
१९ ॥ जैशी पतिव्रता व्रतकरी ॥ परपुरुष संपन्न जरी ॥ नपाहे

नराहे मुख मंदिरी ॥ व्रत सांभाळी आपुलें ॥ २० ॥ स्वपतीचें करीध्यान ॥ नवर्णि पराचेंगुण ॥ वर्णिता नकरीश्रवण ॥ धन्यजाण पतिव्रता ॥ २१ ॥ तैसाआहे वीरशैवधर्म ॥ नसेदुजे देवतेचा नेम ॥ ध्यान स्मरण भक्तिसप्रेम ॥ शिव एक परमात्मा ॥ २२ ॥ इतर देवअसे शिवाचे शेवक ॥ तयाशी पाहता दोषअनेक ॥ भक्ति भावें नमें अर्चता नर्क ॥ प्राप्तहोय श्रुतिवदे ॥ २३ ॥ गुरुआणि लिंग जंगम ॥ तिन्ही पूजेचा एकनेम ॥ भक्तिपूजी भक्तोत्तम ॥ भक्तिस्थल तेंचीपै ॥ २४ ॥ ऐक्यभावें करूनी जाण ॥ त्रिमूर्तिचेंच ध्यानार्चन ॥ सत्यमानीं शास्त्र प्रमाण ॥ भक्तिस्थल तेंचीपै ॥ २५ जंगमस्थला देखोनीनयनीं ॥ स्वपर सूत्रभेद नघे मनीं ॥ धांवून लागेतयाचें चरणीं ॥ भक्तिस्थल तेंचीपै ॥ २६ ॥ जंगमालिंगीं भेदधरितां ॥ अधोगतसि पावें तत्वता ॥ लिंगनिष्ठा त्यजून दैवता ॥ भजेतें अभक्तस्थळ ॥ २७ ॥ गुरुवचनीं अविश्वास ॥ शास्त्र वाक्यास लावींदोष ॥ कुतर्क पांडित्य विशेष ॥ अभक्ति स्थल तेंची ॥ २८ ॥ स्वधर्म पुराणा कांटाळत ॥ परधर्मी श्रवणा धांवत ॥

तयाचेंधर्म श्रेष्टमानित ॥ अभक्ति स्थल तेची ॥ २९ ॥ स्वधर्म सोडून आपुला ॥ जरी उत्तमधर्म स्विकारला ॥ अधोगती नर्क तयाला ॥ स्वधर्म त्यागीताची ॥ ३० ॥ जैसे परस्त्री परधन ॥ अनर्थास होयकारण ॥ तैसें परधर्माचरण ॥ घडे पातक सत्यपै ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ परस्त्री परार्थंच वर्जयद्भाव सुबुद्धिवान् ॥ लिंगनिष्ठा नियुक्तात्मा माहेश्वरस्थलंभवेत् ॥ १५ ॥

॥ टीका ॥ माहेश्वरतोच जंगमजाण ॥ वंद्य पूज्य वीरशैवा लागून ॥ संपूर्ण करिती तयावंदन ॥ शिवमूर्ति ह्मणूनिया ॥ ३२ ॥ परस्त्री आणि परधन ॥ असेजया वमनासमान ॥ बुद्धिशुद्ध लिंगार्चनींलावून ॥ निमग्नअसे आत्मतत्वीं ॥ ३३ ॥ जंगमेंजंगम भक्ति करून ॥ भावें अर्चावें तेलिंगपूजन ॥ गुरुशीभावी शिवासमान ॥ माहेश्वर तयाजाणावें ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ लिंगार्पित पदार्थंच सोभोगी लिंगभोगवान् ॥ अन्यार्पितंचपात्रं नग्राह्य प्रसादंविना ॥ १६ ॥

 

॥ टीका ॥ प्रसाद स्थलाची थोरी ॥ कोणीनपावें बरोबरी ॥ लिंगार्पित निर्धारी ॥ प्रसाद होयसाचतो ॥ ३५ ॥ चरलिंगा वाचूनदुजा ॥ प्रसाद नसेक्रियाकाजा ॥ गुरुलिंग जंगमबीजा ॥ प्रणवप्रसाद शास्त्रविधी ॥ ३६ ॥ तोचीअसे आचारग्राह्य ॥ नातरी अनाचारा साह्य ॥ घेता देतातो धर्मबाह्य ॥ होईलजाण शास्त्रर्थें ॥ ३७ ॥ प्रसाद न मिळे धर्मभ्रष्टा ॥ जोकरी परधर्माचा सांठा ॥ कुतर्की पाखंडमत श्रेष्टा ॥ प्रसाद वर्जअसेपै ॥ ३८ ॥ प्रसाद महिमा विशेष ॥ होतसेरिद्धिसिद्धि वश्य ॥ वेदचर्चा प्राप्त श्वानास ॥ प्रसादानें घडलीसे ॥ ३९ ॥ तयाकारणें वेदजाण ॥ वीरशैवीं नसेमान ॥ पहातांसकल शास्त्रांतून ॥ अधारओहे वीरशैवा ॥ ४० ॥

॥ श्लोक ॥ लिंगप्राण समायुक्तो तथा प्राणलिंगीभवेत् ॥ सुखं दुखंभयंनास्ती प्राणलिंगस्य स्थलंयथा ॥ १७ ॥

॥ टीका ॥ प्राणहाच लिंगह्मणून ॥ लिंगासकेला देहार्पण ॥ लिंगविरहित आपण ॥ कदांनसें प्राणीतो ॥ ४१ ॥ भानुअस्ता गेलीयावरी ॥ किरणें नयती माधारी ॥ किंदीपविझविता मंदिरीं ॥

प्रकाश नराहेतेथें ॥ ४२ ॥ तेवीं लिंगगेलीया देहनराहे ॥ तया प्राणलिंगी बोलतीपाहे ॥ विश्वासें भक्तिची कसुटीसाहे ॥ तरीच मिळे शिवपदा ॥ ४३ ॥ प्राणलिंगीं तत्वसमाधी ॥ लिंगींप्राण आर्पिसुधी ॥ कासयातया मृत्यूपाधी ॥ अमरअसे जगींतो ॥ ४४ ॥ ह्मणून लिंगधारी दहन ॥ नकरणें गोत्रहत्या जाण ॥ स्वसमाधिस्त ह्मणून ॥ समाधिच करितीत्या ॥ ४५ ॥ हाशिव योगपरम पावन ॥ साधनकरितां साध्यहेंजाण ॥ जोअसें वीरशैव कुलोत्पन्न ॥ जाणती विधान गुरुकृपें ॥ ४६ ॥ ऐसेंहें प्राणलिंगींस्थल ॥ तुजला कथीलें मंगळ ॥ प्राणलिंगीं सदानिर्मळ ॥ लिंगध्यानें करूनि ॥ ४७ ॥

॥ श्लोक ॥ शरण्यंच शरीराणां स्वसंपत्ती तथैवच ॥ निष्कामें अर्पितंगुरुं लिंगनिष्ठभवेध्रुवं ॥ १८ ॥

॥ टीका ॥ जोअनुक्रमाचारें करून ॥ सभक्तिभावें लीनहोऊन ॥ स्त्रीपुत्रासहित शरण ॥ मोक्षतेथें राबतसे ॥ ४८ ॥ शीरअन्या न नम्रकरीत ॥ लिंगनिष्ठ षट्काल नेमस्त ॥ पूजाक्रिया सद्भावें अर्चित ॥

शरण तयाह्मणावें ॥ ४९ ॥ गुरु आणिलिंग जंगम ॥ याचेठायीं सद्भद्प्रेम ॥ नविसंबे देशिकानेम ॥ शरण तया ह्मणावें ॥ ५० ॥ लिंगीं रतून लिंगरूप ॥ पाहे चिद्घन स्वस्वरूप ॥ पूर्णगुरुकृपा तद्रूप ॥ शरणतया ह्मणावें ॥ ५१ ॥ गुरुशेवा ती करावया ॥ सदादेह ठेविलापायां ॥ तोडिली संततेचीमाया ॥ तयाशरण ह्मणावें ॥ ५२ ॥ पतीव्रता पतिचे वचनाशी ॥ नटळे सदासावध जैशी ॥ तेवींलिंगपूजा गुरुदर्शनाशी ॥ नटळें काळत्रयीं ॥ ५३ ॥ असेहें शरणस्थळ ॥ निवेदिलें एकवेळ ॥ नसेमोक्षा तळमळ ॥ अनयासें प्राप्तहोय ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ पंच परब्रह्मश्चैव ॐकारो निर्गुणंयथा ॥ ताल्लिंगैक्य प्रवेशंचा ग्न्यौ कर्पूग शेषवत् ॥ १९ ॥

॥ टीका ॥ जोॐकार रूपीं निर्गुण ॥ तोचीईश सर्वसंपन्न ॥ सगुणरूपा धरीजाण ॥ पंचतत्व पंचबीजीं ॥ ५५ ॥ तींबीजें असतीपांच ॥ प्रथमपेरीली साच ॥ त्याचे इछेकरूनिच ॥ तत्वें व्यापीइष्टलिंगीं ॥ ५६ ॥ तेचिजाणावें प्रवर ॥ मुख्य वशं शाखा-

कार ॥ प्रसिद्धपुरुष गोत्र ॥ सूत्र सूचवावया ॥ ५७ ॥ इष्टलिंगीं करितांपूजन ॥ तोतल्लिन मनेंरममान ॥ ससांरींसुख परित्यागून ॥ लिंगरूपीं निमग्नअसे ॥ ५८ ॥ जें सुख दुःख मानापमान ॥ नसे अपपर अभिमान ॥ क्षुधातृष्णा शीतोष्ण जाळून ॥ जोलिंगीं आनंदेराहे ॥ ५९ ॥ कामक्रोध दंभमोह ॥ कैंचातेथें तोसंदेह ॥ मद मत्सर समुदाह ॥ अनुमात्र नस्पर्शी ॥ ६० ॥ मी तूं भाव नसे जयाशी ॥ अशा मनिशा वासनेशी ॥ त्यागूनराहे अहर्निशीं ॥ एक तत्वाशी ऐक्यभावें ॥ ६१ ॥ तत्वा तत्वींनिमग्न होऊन ॥ ईश्वररूप स्वयें बनून ॥ अज्ञ जनाप्रती उद्धरून ॥ नीजमार्गा लावीसुखीं ॥ ३२ ॥ सिद्धिकरजोडून उभी ॥ परी न पाहेकदां नभीं ॥ निरिछेवर्त दयागर्भी ॥ भूतमात्रें समदृष्टि ॥ ६३ ॥ शिवपूजा शिवस्मरण ॥ करितां नसेत्याचेंभान ॥ ब्रह्मतत्वांची मुख्यखूण ॥ लीन जाण तेथेंची ॥ ६४ ॥ तया जरामरण नाहीं ॥ अमरत्व तयादेहीं ॥ पावले योगाभ्यासेही ॥ चंद्रोदय सदाजो ॥ ६५ ॥ अर्धोदयीं प्राप्तसिद्धी ॥ पूर्णादयीं सर्वाआधी ॥ अमृत वृष्टी जेंव्याधी ॥

न राहती कदांपै ॥ ६६ ॥ सर्वनाडीचे विवरणें करून ॥ जेथेंच्या तेथें खुंटवून ॥ दिशा दिशाप्रति स्थापून ॥ दशदारें आकर्षी ॥ ६७ जीवव्यापी शरीराभितरीं ॥ तोकाढून ब्रह्म रंध्रद्वारीं ॥ प्रवेश चंद्रोद-यालहरी ॥ कोटीसूर्य लज्जीततेथें ॥ ६८ ॥ तेंतेज एकाएकीनेत्रीं ॥ नसाहे जीवा अनुमात्रीं ॥ विकलहोती सर्वगात्रीं ॥ नसूचें नकळेतें ॥ ६९ ॥ सांगतांनये वर्णितांनये ॥ गुप्तव्याप्त वेदनाकाय ॥ विस्मरण होऊनलय ॥ लज्जीत पणेंस्तब्ध असे ॥ ७० ॥ असेकांही कालपर्यंत ॥ अभ्यासावें तत्व व्रत ॥ तेणें वाढेंपूर्व सुकृत ॥ मग नभुलें विज्ञानीतो ॥ ७१ ॥ धीरधरून उघडलें नेत्र ॥ तोंतेथें तयाप्रभेच्या परत्र ॥ सुक्ष्म नवर्णवेचि अनुमात्र ॥ ज्योती दिसे लखलखीत ॥ ७२ ॥ तोमार्ग परमकठीण ॥ मनप्रवेश नोव्हेजाण ॥ त्रिकूट बरवें ह्मणून ॥ स्थिरहोती तेथेंची ॥ ७३ ॥ तेथें गुरुचें न चालें ॥ कोण्या उपाया न हलें ॥ एकनिश्चय तत्वींडोले ॥ अत्म दृष्टिकरूनि ॥ ७४ ॥ त्यादृष्टीचें अवरण ॥ सुदृढ होय ह्मणून ॥ मागेनपाहे परतोन ॥ तरीच चढेंपुढती ॥ ७५ ॥

विद्युत् चपळतीं अत्मदृष्टि ॥ चमकून मिळे ज्योतीपोटीं ॥ मागुती च-
ढून येत त्रिकुटीं ॥ उठाउठी भेटतसे ॥ ७६ ॥ जीवशिवा पडल्या
गांठी ॥ हीच ऐक्यतांहोय मोटी ॥ तत्व देखिल्या विना सृष्टी ॥ उ-
द्भवहोय जाणहे ॥ ७७ ॥ हा जाणूनऐक्य योग ॥ जोकरी लिं-
गार्चासांग ॥ तोऐक्य रूपाचा मार्ग ॥ पावला असेशिवे ॥ ७८
इतिश्री परमरस्य सारामृत ॥ टिकाकरूनिया प्राकृत मन्मथ शिव-
लिंग कृत ॥ द्वादशमोध्यायः ॥ ७९ ॥ श्री परमात्मा शिव
ब्रह्मायनमः ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥



॥ श्री ऐक्यरूपीं निर्गुण ज्योती लिंगाय नमः ॥ श्री गुरु वे नमः ॥ मागील अध्यायाचे अंतीं ॥ सहा स्थलाची निजस्थित्ती ॥ तीश्रुत केली मजप्रती ॥ कृपादृष्टि करूनिया ॥ १ ॥ आतां पुढें सुरसप्रकार ॥ देवीस्वप्रश्न करी साचार ॥ तेवीरशैव धर्माचे सार ॥ वारंवार प्रगटवी ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ पार्वत्यु वाच ॥ किंमिश्रितं यथाभक्त किंमिश्रितं माहेश्वरः ॥ किंमिश्रिंतु प्रसादीच किंमिश्र प्राण लिंगिनः ॥ १ ॥ किंमिश्रंतु शरण्यंच किंमिश्रं ऐक्य मेवच इत्यव मिश्रतभावं ब्रूहिमे परमेश्वर ॥ २ ॥

॥ टीका ॥ पार्वती ह्मणेजी दातारा ॥ षडलिंग षटस्थळ विचारा ॥ मिश्रितभाव करुणाकरा ॥ श्रुतकरी आदरे ॥ ३ ॥ भक्त माहेश्वर प्रसादी ॥ प्राण लिंग शरण्यैक्यादि ॥ यर यरा मिश्रित कर्धी ॥ होती सांगा मजलागी ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ इश्वरो वाच ॥ भक्तोमाहेश्वरश्चैव प्रसादी प्राणलिंगकः ॥ शरण्यः शिवलिंगैक्य एकैकंतु सुमिश्रितं ॥ ३ ॥

॥ टीका ॥ शंकर ह्मणे पार्वतीसी ॥ भक्तमिश्रीत माहेश्वराशी ॥ माहेश्वर नामिसळे भक्ताशी ॥ सत्य जाण वराननें ॥ ५ ॥ प्रसादी मिळें प्राणलिंगाशी ॥ शरण मिळे ऐक्याशी ॥ नटळे कल्पांति लयाशी ॥ स्थितीजाण ऐशीही ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ भक्तोमाहेश्वरश्चैव प्रसादी प्राणलिंगकः ॥ शरण्य ऐक्यानामंग वदास्वामी प्रथक् प्रथक् ॥ ४ ॥

॥ टीका ॥ पार्वती ह्मणे शंकराप्रती ॥ षट्स्थळाची अंगे कोणती ॥ तीं सांगावीमजला निश्चिती ॥ कृपाळू होऊनिया ॥ ७ ॥ अंबेचा प्रश्न रहस्य सार ॥ प्रगट करी वारंवार ॥ शंकर सांगे अरूवार ॥ जगउद्धारा कारणें ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरूवाच ॥ भक्तिस्थलान् अंगंपृथ्वी जलं माहेश्वरानूतथा ॥ प्रसादानंग वन्हिश्च प्राणलिंगा न्समीरणः ॥ ५ ॥ शण्यानंग आकाशंच ऐक्यानत्मांग एवच ॥ एवमंग स्थलंज्ञानं सूक्ष्मंश्रुतंवरानन ॥ ६ ॥

॥ टीका ॥ शंकर ह्मणे पार्वतीसी ॥ तूं पुसिलें स्थल अंगासी ॥

पृथ्वी अंगभक्ति स्थलासी ॥ असेजाण निश्चयें ॥ ९ ॥ माहेश्वर स्थला अंगजल ॥ तेजें शोभेंप्रसाद निर्मळ ॥ जगत्प्राण प्राणलिंगा मेळ ॥ असेजाण शुभानने ॥ १० ॥ अकाश अंग शरण्यासी ॥ आत्मतत्वांग ऐक्यत्वासी ॥ मजपावती निश्चयेशीं ॥ येणेंमार्गें साक्षपें ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ एतेषां षट् स्थालानांच केवा हास्तो भवंत्यपि ॥ हस्तभेद न जानामि ब्रूहिमे परमेश्वर ॥ ७ ॥

॥ टीका ॥ देवी प्रश्नकरी प्रेमेंशंकराशी ॥ कवण हस्त कवण्या स्थळाशी ॥ त्यांचीं नामेंकोणती तीं सांगामजशी ॥ कृपानिधि साक्षपे ॥ १२ ॥ श्लोक ॥ ईश्वरूवाच ॥ भक्तस्थलेसुचितेव सुबुद्धिच माहेश्वरः ॥ प्रसादे निरहंकारैः सुमनःप्राणलिंगिनः ॥ ८ ॥ ज्ञानहस्त शरण्यस्य भावस्यात् ऐक्यमेवच ॥ यतद्धस्तौ परिज्ञान विशेष श्रुणु पार्वती ॥ ९ ॥

॥ टीका ॥ शिवह्मणे गिरजे ऐक ॥ षट्स्थलाचे हस्तक ॥ सुचित्त हस्ते भक्तदेख क्रियेंलागीं सांभाळी ॥ १२ ॥ सुबुद्धिहस्त मा-

हेश्वराशी ॥ निर हंकार हस्त प्रसादाशी ॥ सुमन हस्त प्राण
लिंगाशी साजरादिसे सत्यपै ॥ १४ ॥ शरण्यास ज्ञानहास्त ॥
भाव हस्त ऐक्यानिभ्रांत ॥ ऐसे साही हस्त शोभत ॥ षट् स्थ-
ळां जाणावें ॥ १५ ॥ आदि षट् स्थळाची निरोपिलीं अंगें ॥
आतां श्रवण केले हस्त सवेग ॥ देवी ह्मणे कोण स्थला को-
णालिंग ॥ वंद्य पूज्य सर्वस्वी ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ भक्तानांच कथंलिंगः माहेश्वरान् कथं
भवेत् ॥ प्रसादानांच लिंगकिं किंलिंग प्राणलिंगीनां ॥ १० ॥
किं लिंगस्तु शरण्यस्य ऐक्यस्यच वदप्रभो ॥ यताल्लिंगस्य नामानि
श्रुतुमिच्छमी सादरैः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ पार्वतीह्मणे वीर भक्ताशी ॥ लिंगकोण प्रथम स्थ-
लासी ॥ माहेश्वर आणि प्रसादी याशी ॥ लिंगकोण मोक्षदेता ॥
१७ ॥ प्राणलिंगाशी कवणालिंग ॥ शरण्याप्रत्ती तैसेच सवेग ॥
ऐक्याचे अराध्य कोणसांग ॥ लिंगपूज्य यरयरा ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ भक्तानाचार लिंगस्य गुरुलिंगः माहे-

श्वरान् ॥ शिवलिंग प्रसादीनां जंगमप्राण लिंगीनां ॥ १२ ॥
ऐक्यान् महालिंगश्चैव प्रसाद शरण्यस्यच ॥ इत्यते स्थलानिज्ञातुं वि-
शेषेश्रुणूपार्वती ॥ १३ ॥

॥ टीका ॥ ईश्वरह्मणे वोगिरजे ॥ भक्ताशी आचारलिंग जा-
णीजे ॥ गुरुलिंग माहेश्वरा पूज्य ॥ शिवलिंग प्रसादिया ॥ १९ ॥
जंगमलिंग प्राणलिंगासी ॥ तैसाच प्रसाद शरणाशी ॥ लिंग जा-
णावा अविनाशी ॥ इष्टअराधनें सत्यपै ॥ २० ॥ महालिंगतो ऐक्य
स्थलासी ॥ साक्षात्कार दाखवी मानसीं ॥ सजीव बीज वर्तेस्थला-
शी ॥ निजरूपासी जाणावया ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ अचारस्य मुखं किंवा गुरुलिंग मुखंतथा ॥
शिवलिंग स्यैवमुखं चरलिंगस्तु किंभवेत् ॥ १४ ॥ प्रसादमहा लिं-
गश्च कोवामुख भवेत्खलु ॥ तन्मुखानि क्रमाणेव षट्लिंगस्यात्
कथंभवेत् ॥ १५ ॥

॥ टीका ॥ देवीह्मणे शंकराप्रती ॥ आचार्लिंगा मुखें कोणती ॥
गुरुलिंगा काय ह्मणती ॥ तेवीं शिवलिंगापै ॥ २२ ॥ चरबोलती जं-

३

गमासी ॥ प्रसाद महालिंगासी ॥ मुखेकिती तीं कवणासी ॥ वेग-
ळाली सांगामज ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ ममपंच मुखोद्भतो पंचलिंग यथाक्र-
मात् ॥ तथा पंच मुखेनैव पंचलिंग समाश्रुतं ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ईश्वरह्मणे आंबेऐक ॥ मजपासून लिंगेदेख ॥ उ-
त्पन्नझाली पंचनायक ॥ मजसम जाणीजे ॥ २४ ॥ मीआहे शिव
पंचमुख ॥ तितुकीच लिंगासाधक ॥ कमीहोता न्यूनाधिक ॥ ई-
श शक्ती कैचीतेथें ॥ २५ ॥ यास्तव ईश्वर मुखेपांच ॥ तींच असती
लिंगासाच ॥ त्यावांचून स्वसामर्थ्यच ॥ नसेजाण नगात्मजे ॥२६ ॥

॥ श्लोक ॥ महालिंग प्रसादंच जंगम शिवलिंगकः ॥ आचारं
पंचमं वक्त्रं गुरोः संती मुखानिच ॥ १७ ॥

॥ टीका ॥ महालिंग आणिप्रसाद ॥ जंगमलिंग प्रसिद्ध ॥ शि-
वलिंग अचार शुद्ध ॥ हीं पांचमुखें गुरुचीजाणा ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ महालिंग प्रसादंच आचार जंगमस्तथा ॥ गुरु पंच
मुखंचैव इत्यतेशिवलिंगयोः ॥ १८ ॥

३

॥ टीका ॥ महालिंग आणिप्रसाद लिंग ॥ जंगम आणि गुरुलिंग ॥ आचाराचा नोव्हेभंग ॥ शिवलिंगाचीं मुखेंपै ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ आचारज्ञान मिश्रंच गुरुलिंग प्रसादकः ॥ शिवपंच
मुखंचैव इति जंगम लक्षणं ॥ १९ ॥

॥ टीका ॥ महालिंग प्रसाद लिंगजाण ॥ शिवलिंग गुरुलिंग नेमून ॥ आचारापंच लिंगमानून ॥ जंगम लिंगा मुखेंही ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानाचार गुरुलिंग शिवजंगम एवच ॥ एतेपंच समायुक्तं प्रसादालिंग लक्षणं ॥ २० ॥

॥ टीका ॥ महालिंग आचार लिंग ॥ गुरुआणि जंगमलिंग ॥ पांचवें जाणावें शिवलिंग ॥ ही प्रसाद लिंगाचींमुखें ॥ ३० ॥

॥ श्लोक ॥ जंगमशिवाचारश्च गुरुलिंग प्रसादकः ॥ एतेपंच
मुखंचैव महालिंगस्य लक्षणं ॥ २१ ॥

॥ टीका ॥ जंगम शिवलिंग आणिआचार ॥ गुरुलिंग तैसेच प्रसादाकार ॥ हीं पंचमुखें जाणावीं सविस्तर ॥ महालिंगा ची सत्यपै ॥ ३१ ॥ शिवह्मणे हीं लिंगमुखें ॥ तुज सांगितलीं मेनके ॥

पंचमुखांचीं हीं कौतुकें ॥ नामें जाण कळावया ॥ ३२ ॥ पार्वती
४ ह्मणे गुह्यकळलें ॥ आजीभाग्य उदयाआलें ॥ बहुसखोल आर्थीबळें ॥
नजाणतें कोणाशी ॥ ३३ ॥ पंचमुख तो पंचानन ॥ नामप्रसिद्ध
सगुणालागून ॥ शिवनिर्मित सृष्टिजाण ॥ पंचमुख असेपै ॥ ३४ ॥
जेनरकरती शिवधर्माचरण ॥ तयाचेंतुटें जन्ममरण ॥ संसाराचें नुरें
कारण ॥ शिवपदां योग्यतो ॥ ३५ ॥ जन्ममृत्युचा दरारां ॥
अशैवालागी निर्धारा ॥ नेमिले यमकिंकरा ॥ शिक्षाद्यावया कारणें ॥
३६ ॥ शैवाचें मुखीं शिवनाम ॥ वीरशैवांग लिंगसम ॥ तयाचे
सुक्ष्मधर्मीनेम ॥ नकळे इतराप्रती ॥ ३७ ॥ जेकरिती शिवागम
श्रवण ॥ तेणेंशिवाचार होयसंपन्न ॥ स्त्रीपुत्रादि शेवकजाण ॥ हो- ४
ती निपूण लिंगधर्मि ॥ ३८ ॥ ऐसाशिवाचार जाण ॥ तोऐकता
परमपावन ॥ जोवर्ते शिवाचार पूर्ण ॥ उद्धरून जायतो ॥ ३९ ॥
वीर शैवधर्म परम कटीण ॥ तो नजाणावा इतरासमान ॥ क्रिया शु-
ध्द परम पावन ॥ असेजाण लिंगधारी ॥ ४० ॥ पुजाहाची नित्य
नेम ॥ भाक्तिभावें तो सप्रेम ॥ जोगुरु लिंग जंगम ॥ त्याते भज

आवडी ॥ ४१ ॥ ह्याचपंच लिंगा पासून ॥ पंचा चार झालेनि-
र्माण ॥ तेलिंगांगीजाणती खूण ॥ इतरा नकळे तत्वपै ॥ ४२ ॥
परी लिंग पुराणाचेठायीं ॥ रुद्र सृष्टिचा अनुयायी ॥ उल्लेख असे-
मर्म न्यायीं ॥ समाधान पुरुषापै ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ पंचभूत मयंदेहं किंभेदंच समर्पितं ॥
अर्पितस्य मुखंकिवा तन्मुखं कथयस्वमे ॥ २२ ॥

॥ टीका ॥ गिरीजा ह्मणेशंकरा प्रती ॥ जे पंचमुतीक शरीर अ-
र्पिती ॥ कोण्यालिंगा कोणतत्वें निवेदिती ॥ तेमजला निवेंदावें ॥ ४४

॥ श्लोक ॥ ईश्वरूवाच ॥ आचारस्यार्पितापृथ्वी गुरुलिंगार्पितं
जलं ॥ शिवलिंग अर्पितं तेज वायुश्च जंगमार्पितं ॥ २३ ॥ प्रसा-
दार्पित माकश महालिंगे महातत्त्वं ॥ एवंपंचमुखंज्ञानं दुर्लभं श्रुणू
पार्वती ॥ २४ ॥

॥ टीका ॥ शंभुह्मणे देवी ऐकमात ॥ आचर लिंगासी पृथ्वी
अर्पित ॥ गुरुलिंगाशी आप निभ्रांत ॥ शिवालिंगाशी तेजते ॥ ४५
वायुजंगम लिंगी अर्पण ॥ अकाश प्रसादी निवेदन ॥ महालिंगासी

अर्पित जाण ॥ ॐकार प्रणवतो ॥ ४६ ॥ ऐसेंह्या षट्लिंगा अर्पणीं ॥
९ तत्वाजाणें तोचिज्ञानी ॥ वीरशैव धर्मावर्णी ॥ त्याचें चरण वंदावें ॥
४७ ॥ श्लोक ॥पंचविषयादिभोगं पंचाक्षर समन्वितं ॥ पंचइंद्रिय
समायुक्त पंचवक्त्र समर्चितं ॥ २५ ॥ पंचादिकाम भावेन् दुर्लभंतु
मुक्तिपदं ॥ शब्दस्पर्श रूपंच रसगंधश्च पंचमं ॥ २६ ॥

॥ टीका ॥ पंचविषयादि भोग जेजे ॥ तेते पंचाक्षरीं अर्पण कीजे ॥ पंचइंद्रिय द्वार समर्पिजे ॥ लिंगनिष्ठें करूनि ॥ ४८ ॥ पंच इंद्रिय पंचविषयासी ॥ अर्पि मनबुद्धि सहा लिंगासी ॥ तोचीलाधे सवेग मुक्तिपदासी ॥ इतरातें दुर्लभ असें ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ एवंपंचादिकंचैव पंचवक्त्र सदाशिवः॥ अर्पितंच य-
थाभाग तथा ध्रुवपदं भवेत् ॥ २७ ॥ ९

॥ टीका ॥ एवंपंच विषयादि भोग ॥ पंच मुखींसमर्पि चांग ॥ तो ज्ञानिया होयअभंग ॥ शिवपद प्राप्त त्यासी ॥ ५० ॥ ऐकून संतोषली गीरिजा ॥ अर्पण विधिच्या निजबीजा ॥ ओळखून हि-मनगात्मजा ॥ सांगाह्मणे शिवाप्रती ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ कस्मातु लिंगार्पितस्य शब्दकस्मा लिंगार्पितं ॥ स्पर्शः कस्माल्लिंगरूपो रसः कस्मात्समर्पितः ॥ २८ ॥
गंधः समर्पितः कस्माद्दर्पणस्य ज्ञानकथं ॥ इतिभेद नजानामि ब्रूहिमे परमेश्वर ॥ २९ ॥

॥ टीका ॥ पार्वती विनवी कैलास पती ॥ कोणविषय कोणलिंगा प्रती ॥ अर्पिणे असें कवणें स्थिती ॥ तेनिवेदावें सर्वेशा ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ शब्दप्रसादलिंगंच स्पर्शनं चरलिंगयोः ॥ शिवलिंगार्पितं रूपं गुरुलिंगार्पितंरसः ॥ ३० ॥ गंधमाचार लिंगस्य महालिंग प्रणामकं ॥ यतन्मुख परिज्ञानं दुर्लभ श्रुणु पार्वती ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ ईश्वरह्मणे पार्वतीस ॥ शब्दविषय प्रसादास ॥ स्पर्शतोअर्पि जंगमास ॥ शिवलिंगा तेजपै ॥ ५३ ॥ गुरु लिंगाअर्पितसे रस ॥ आचाराप्रति गंधसुरस ॥ महालिंगा ॐकार तेजस ॥ आर्पण विधियणेंपै ॥ ५४ ॥ ऐसाविधिनेमें चालता ॥ तरीसायुजता येईहाता ॥ दुर्लभअसे अचारतां ॥ वीरव्रत लिंगधारी ॥ ५५ ॥

॥ श्लोक ॥ यदिंद्रिय मुखंज्ञानं तदाइंद्रय मुखंनच ॥ अन्येंद्रिय नभोक्तव्य एवंभूषणादिवत ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ येथें ज्ञानिया ह्मणीजेकां स्तवीजे ॥ ना तोयोग्या योग्य जाणिजे ॥ जेथिचें भोक्तव्य तेथेंची दीजे ॥ हेंजाणें तोची धन्य ॥ ५६ ॥ आनइंद्रियाचे विषयी अनसी ॥ भोक्तव्य नोव्हे तयासी ॥ ज्याचेविषय तेणेंत्यासी ॥ मुख्यत्व भोगीजे ॥ ५७ ॥ जैसेअन स्थानाचें भूषण ॥ आनस्थानीं लेताअमान्य ॥ स्थानिचें स्थानीं शोभायमान ॥ दिसतसे साजरें ॥ ५८ ॥ पहातां तरी एकचीभोक्ता ॥ दुसरातेथें नाहींसर्वथा ॥ परीइंद्रिय द्वारें भोक्तव्यता ॥ भिन्नत्वानें भोगावया ॥ ५९ ॥ भिन्नभिन्न पदार्थ भोगीं ॥ परीऐक्यत्वें एकचअंगीं ॥ निषय अनरिश परीनिजांगी ॥ भोक्ता तोएकची ॥ ६० ॥ पार्वती ह्मणें शंकराशी ॥ हे विषयमिश्रीत काशी ॥ कोणविषय कोणासी ॥ मिश्रीत असें ॥ ६१ ॥ शंकरह्मणें देवीसी ॥ एक एक मिश्रीत पांचासी ॥ असेविषय मिश्रीत यर यराशी ॥ जाण सत्य देवीपै ॥ ६२ हे मिश्रीत मुखजाणून ॥ जोकरी आत्मार्पण ॥

तोचीज्ञानी पूर्णजाण ॥ वीरशैव धर्मीका ॥ ६३ ॥
७ ॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ श्रोत्रेंद्रिय समायुक्तं प्रसादलिंग मेवच
॥ त्वकेंद्रिय समायुक्तं गुरुलिंग तथैवच ॥ ३९ ॥ चक्ष्वींद्रिय समुत्पन्नं
शिवलिंग तथैवच ॥ जिव्हेंद्रिय समायुक्तं गुरुलिंग तथैवच ॥ ४० ॥
घ्राणेंद्रिय समायुक्तं आचारं लिंगमेवच ॥ हृदेंद्रिय मुखंचैव महा-
लिंगस्तथैवच ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ पार्वती ह्मणे ऐकओजे ॥ श्रोत्रेंद्रिय प्रसादा बोलीजे ॥
त्वकेंद्रिय जंगम जाणिजे ॥ चक्षुते शिवलिंगापै ॥ ६४ ॥ जिव्हेंसी
गुरुलिंग जाण ॥ घ्राणास आचार नेमून ॥ मानस हृदयासी मिळून
॥ महालिंग साक्षपे ॥ ६५ ॥ षट्लिंग षडिंद्रिय मुखें ॥ षट्वि
षय भोगिती सुखे ॥ षट्स्थलाशी भोक्तव्य निके ॥ प्रसाद मुखची ७
॥ ६६ ॥ याइंद्रिय मुखेंकरून ॥ प्रसाद भोगघडे पूर्ण ॥ मानस
इंद्रियाचें मुखजाण ॥ ऐक्यस्थळ बोलीजे ॥ ६७ ॥ श्रोत्रमुखजाणून
शद्वातें घेणें ॥ तयाशरण्य स्थला प्रसादी ह्मणणें ॥ त्वकेंद्रिय मुखे
स्पर्शवनें ॥ तोप्राणलिंगी प्रसादीजाणा ॥ ६८ ॥ चक्ष्विंद्रिय

मुखेंकरून ॥ प्रसादह्मणती त्यालागून ॥ वीरशैवतेची अग्रगण ॥ प्रसादाशी जाणपा ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ जिंव्हेंद्रिय मुखंज्ञात्वा तत्प्रसादि माहेश्वरं ॥ घ्राणेंद्रिय मुखंज्ञात्वा तथाभक्तप्रसादकं ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ जिंव्हाइंद्रिय मुखजाणणें ॥ प्रसादघेणें माहेश्वरानें ॥ घ्राणेंद्रिय मुखेगंध शेवन ॥ भक्तप्रसादि सत्यपै ॥ ७० ॥ आतां षट्स्थल षट्लिंगाशी ॥ कवण्याहस्तें कोणअंगाशी ॥ तत्वज्ञानाची खूणकैशी ॥ सांगाह्मणे सर्वेशा ॥ ७१ ॥ असोपार्वती प्रतिशंकर ॥ भक्तिज्ञान सांगेंवारंवारं ॥ ऐकतातेवीरशैवें एकाग्र ॥ पावनहोती गुरुकृपें ॥ ७२ ॥ इतिश्री परमरहस्य सारामृत ॥ टीकाकरूनिया प्राकृत ॥ मन्मथ शिवलिंग कृत कृत ॥ त्रयोदशमोध्याय संपूर्णमस्तु ॥ ७३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥



॥ श्री सगुणरूपींईश्वराय नमः ॥ श्री गुरुभ्यो नमः ॥ मागलि त्रयोदेश अध्यायाचे अंती ॥ पार्वती प्रश्नकरी शंकराप्रती ॥ परम संतोषून उमापती ॥ उपदेश करीतसे ॥ १ ॥ देवीह्मणें अपर्णा पति ॥ माझीपरीसावी विनंती ॥ कोण्याहस्तें कोण्यालिंगाप्रति ॥ पूजावें तें सांगामज ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ चित्तहस्तेन भूम्यांगो भक्तस्याचार लिंगके ॥ घ्राणेचैतन्य मुखंचैव गंधतृप्तिश्चभोगवान् ॥ १ ॥

॥ टीका ॥ शंकरह्मणे पार्वतीसी ॥ अधिऐक भक्तिस्थलासी ॥ कोणअगें कवण्या स्थलाशी ॥ अर्पितसे भक्तो ॥ ३ ॥ भूमीअंग सुचिहस्तें ॥ घ्राणमुखीं सुगंधाते ॥ तृप्तिकरी आचारलिंगाते ॥ भक्ताचार जाणीजे ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ माहेश्वरो जलांगेच शुद्धहस्त गुरुलिंगः ॥ जिव्हांभेद समर्पितं तृप्तिभोगभोगवान् ॥ २ ॥

॥ टीका ॥ जलांग सुबुद्धहस्ते ॥ जिंव्हा मुखरस विषयाते ॥ तृप्तिकरी गुरुलिंगाते ॥ माहेश्वराचार तोची ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ निरहंकार हस्तेन अनलांग प्रसादीच ॥ शिवलिंग मुखंनेत्रं रूपार्पित सुभोगवान् ॥ ३ ॥

॥ टीका ॥ जेलिंग निरहंकार हस्ते ॥ नेत्र मुख रूप विषयाते ॥ तृप्तकरी शिवलिंगाते ॥ तोप्रसादाचार जाणावा ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ मनोहस्त वायुरंगे प्राणलिंगी तथैवच ॥ जंगमत्वं मुखेनैव अर्पितंस्पर्शनं भवेत् ॥ ४ ॥

॥ टीका ॥ वायुअंग सुमनहस्ते ॥ त्वकेंद्रिय मुखस्पर्श विषयाते ॥ तृप्तिकरी जंगमलिंगाते ॥ तोप्राणलिंचार जाणावा ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानहस्तेनशरणं व्योमांगेच प्रसादके ॥ श्रोत्रंच तन्मुखंचैव अर्पितं शद्बभोगवान् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ व्योमांगे ज्ञानहस्ते ॥ श्रोत्रमुखें शद्बविषयाते ॥ अर्पितकरी प्रसादलिंगाते ॥ तोशरणाचार जाणावा ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ आत्मांगे भावहस्तेन ऐक्यंचापि महत्मके ॥ हृदन्मुखार्पितचैव प्रणायां तृप्तिरुच्यते ॥ ६ ॥

॥ टीका ॥ मानसआत्मांगे भावहस्ते ॥ इंद्रियमुखे प्राणविष-

याते ॥ अर्पणकरी महा लिंगाते ॥ तोऐक्य स्थानाचारपै ॥ ९ ॥


ऐसेहे षड्लिंगेकरून ॥ षड्हस्तें द्रिय मुखेंपूर्ण ॥ यास जो-
करीनिवेदन ॥ तेसत्य शरणबोलिजे ॥ १० ॥ हे कळाजाणून करी
पूजन ॥ तोचीहोय सदाचार सपन्न ॥ तयाचेयोगे करूनिजाण ॥
धर्मवाढें कलयुगी ॥ ११ ॥ तयाचें दर्शन संभाषण ॥ ज्याघडेतो
भाग्यशालीपूर्ण ॥ त्याचेचुकलें जन्ममरण ॥ कलीकाळ शरणतया ॥
१२ ॥ तोजयाकडे कृपेनेंपाहे ॥ तयासुखसृष्टि प्राप्तआहे ॥ तोसदा
मोक्षाठाई राहे ॥ धन्यभाग्य जयाचे ॥ १३ ॥ तयाच्या दाशी च्यारी
मुक्तिजाण ॥ अष्टमासिद्धि येईशरण ॥ परीतो नभुले तयालागून ॥
निराश होऊनिया ॥ १४ ॥ ऐसेजे असती शरण ॥ तेचीआचारा-
सी अग्रगण ॥ शिवाचारा प्रती संपन्न ॥ मुगुटमणी आमुचे ॥ १५
तयाचे योगें करून ॥ शिवाचार प्रगटे विस्तीर्ण ॥ शिवभक्ति परम
पावन ॥ तयाचे नियागे ॥ १६ ॥ मीअसे निर्गुण निराकार ॥
भक्तिलागी झालों साकार ॥ भक्तमाझे हृदयीं निरंतर ॥ दयाउत्पन्न
करितसे ॥ १७ ॥ तेकरिती सदामाझे चिंतन ॥ ह्मणूनत्याचे अखंड

मजस्मरण ॥ मी न विसंबे एकक्षण ॥ भक्तवत्सल मीहोय ॥ १८ ॥
तो माझाआप्त असे साचार ॥ तयाचा मज अतिप्रेमसार ॥ जैसी
गोडीआणि साखर ॥ एकमेका नसोडीती ॥ १९ ॥ ऐसेऐकून पा-
र्वती ॥ महानंद पावली चित्तीं ॥ मगअनेक प्रकारें विनंती ॥ करूं
लागली भर्गाप्रती ॥ २० ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ कथंमुत्पद्यतेभाव कथंज्ञानं समुद्भवं ॥
कथंसुमन उत्पन्नं कथंहंकारएवच ॥ ७ ॥

॥ टीका ॥ पार्वतीह्मणे शंकराशी ॥ सहाहस्ताची उत्पत्तिकैशी ॥
कोण कोणापासून कैशी ॥ झालीसे स्वामीया ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ वस्तुनाभाव उत्पन्नं भावज्ञान समुद्भवः
॥ ज्ञानाचमन उत्पन्नं मनसोपि अहंकृती ॥ ९ ॥ अहंकारे
च बुद्दिच बुद्दिचित्त समुद्भवः ॥ एकैकंच समुत्पन्न सुक्ष्मासुक्ष्म
वरानने ॥ १० ॥

॥ टीका ॥ शंकरह्मणे पार्वतीला ॥ वस्तुपासून भावहस्तझाला ॥
भावापासून उत्पन्नकेला ॥ तोचीज्ञान हस्त जाणिजे ॥ २२ ॥ ज्ञा-

 

नहस्ता पासून ॥ सुमनहस्त झालाउत्पन्न ॥ सुमनहस्ता ते जाणून ॥ निर्हंकार हस्त झाला ॥ २३ ॥ निरहंकारें सुबुद्ध ॥ हस्त निर्मिलासे शुद्ध ॥ तया सुचितविबुध ॥ षड्हस्त प्रसिद्धहे ॥ ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ चिंताकिं लिंगधारीच बुद्धिकिं लिंगधारिणी ॥ अहांकारस्यात् किंलिंग किंलिंगस्य मनस्तथा ॥ ११ ॥ ज्ञानहस्तस्य किंलिंग किंलिंग भावहस्तकं ॥ इतिभेदनजानामी ब्रूहिमे परमेश्वर ॥ १२ ॥

॥ टीका ॥ पार्वतीह्मणे शंकर ॥ आजीसांगा लिंगप्रकार ॥ कोण्यालिंगा कोणआकार ॥ वेगळाले सांगामज ॥ २५ ॥ ज्ञानहस्ताचा लिंगकोण ॥ तैसाच भावहस्ताचें प्रमाण ॥ यणेंचपरि षड्लिंग पूजन ॥ कैसेघडे तें कळवावें ॥ २६ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ चित्तस्याचार लिंगस्य गुरुलिंग सुबुद्धिना ॥ शिवलिंग हंकारस्य मनोहस्तेन जंगमः ॥ १४ ॥ प्रसादो ज्ञानहस्तस्य महालिंगस्य भवकं ॥ एतेगुहे तरश्चैव सूक्ष्म श्रु-

णूपार्वती ॥ १५ ॥
३ ॥ टीका ॥ शिवह्मणे वो गिरीजे ॥ सुचितहस्तें आचाराधरिजे ॥
सुबुद्धें गुरुलिंगा पूजीजे ॥ शिवालिंगा निरहंकारें ॥ २६ ॥ सुमन
हस्तें जंगम लिंगाते ॥ ज्ञानेन प्रसाद लिंगाते ॥ भावतो महालिं-
गाते ॥ पूजीसत्य वरानने ॥ २७ ॥ हेअंतरज्ञान माझेजाण ॥
अत्यंत सूक्ष्मप्रमाण ॥ तें तुजकेलें निरोपण ॥ भक्तालागी कळा
वया ॥ २८ ॥ भक्ति विश्वासें करून ॥ हे श्रवणकरील सुजाण ॥
तोची वीरशैवाचा प्राण ॥ माझाहीजाण असेपैं ॥ २९ ॥
॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ किं मिश्रंचित्त बुद्धिश्च किमहंकार मान-
सं ॥ किं मिश्रं ज्ञानभावश्च ब्रूहिमेपरमेश्वर ॥ १६ ॥
॥ टीका ॥ हे षडहस्त षडस्थळाशी ॥ मिश्रीतअसे कोण्या प- ३
दार्थासी ॥ ते निरोपा ह्मणेंमजशी ॥ पार्वती देवीसादरें ॥ ३० ॥
॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ भावपंच समायुक्तं ज्ञानपंच समन्वितं
॥ मनः पंचसमायुक्तं महंकारस्तथैवच ॥ १७ ॥ बुद्धिपंच समा
युक्ता चितंपंच समन्वितं ॥ एकैक पंच समायुक्तं सूक्ष्मा त्सूक्ष्म

वराननें ॥ १८ ॥

॥ टीका ॥ ईश्वरह्मणे सुंदरीस ॥ एकहस्त पांचपांचास ॥ मिश्रीत असती सावकाश ॥ निरुपिले वेळोवेळा ॥ ३१ ॥ ऐक्य स्थळाचा जोभावहस्त ॥ तोपांचासी असेनिश्चित ॥ ऐसाच शरणाचा ज्ञानहस्त ॥ मिश्रीतअसे पांचाशी ॥ ३२ ॥ प्राणलिंग हृंकार हस्त ॥ तोही पांचासअसे मिश्रीत ॥ तैसाची प्रसादीयाचा निरहंकार हस्त ॥ तोही मिश्रीत पांचाशी ॥ ३३ ॥ माहेश्वरी सुबुद्द हस्त ॥ तोहीपांचास असे मिश्रीत ॥ भक्तिसी जोसुचितहस्त ॥ तोही मिश्रीत पांचाशी ॥ ३४ ॥ याचप्रकारें संपूर्णास ॥ मिश्रता आली अनायास ॥ वर्मजाणून अनुभवास ॥ आचार दृढ पाहिजे ॥ ३५

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ सहभोजन किंभेदः किंभेद सहवर्तनी ॥
तद्भेदाश्च नजानामी करुणार्णव तद्वद ॥ १९ ॥

॥ टीका ॥ गौरीह्मणे महेशाप्रती ॥ सहभोजनाची कैशीव्याप्ति ॥ त्याभेदाची अंगेंकोणती ॥ कृपाकरूनि सांगावी ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ घ्राणमाचार लिंगस्य गंधग्रण्हतिय

स्तथा ॥ जिंव्हाद्वारें रसश्चैव गुरुलिंग सुभोज्यते ॥ २० ॥ त्वकं-
४ च जंगमंलिंगं स्पर्शमादाय सादरात् ॥ श्रोत्रेणशब्दं गृण्हंति प्रसाद
लिंगमेवच ॥ २१ ॥

॥ टीका ॥ भक्त भुम्यागें सुचिहस्तें ॥ घ्राणद्वारें गंधविषयातें ॥ आचार लिंग अर्पणाते ॥ भोग्तृत्व होयजाण ॥ ३७ ॥ अपांग सुबुद्धहस्तें ॥ जिंव्हरस विषयांते ॥ गुरुलिंग अर्पणाते ॥ भोग्तृत्व होतसे ॥ ३८ ॥ तेजांगें निर्हंकार हस्तें ॥ चक्षुद्वारेंरूप विषयाते ॥ शिवलिंग अर्पण घडें तें ॥ गुरुमुखीं ओळखावें ॥ ३९ ॥ वायुअंगें सुमनहस्तें ॥ त्वक्द्वारें स्पर्श विषयाते ॥ जंगमलिंग अर्पणाते ॥ ममतृप्ति घडतसे ॥ ४० ॥ शरण नभांगें ज्ञानहास्तें ॥ श्रोत्रद्वारें ४
शब्द विषयाते ॥ प्रसादात्मक लिंगाप्रीत्यर्थें ॥ भोग्तृत्वजाणावें ॥ ४१ ॥ असेहेपांच लिंगाचें भोक्तेपण ॥ तुजनिरोपिलें विवरण ॥ आतांमहा लिंगाचें भोक्तलक्षण ॥ निवेदितो ऐकपा ॥ ४२ ॥

॥ श्लोक ॥ हृदीनांच महालिंग परिणाम प्रयंछती ॥ इतिलिंगा
तृप्तिभेदं सुसूक्ष्मंच वरानने ॥ २२ ॥

॥ टीका ॥ चिदांग तैसाची भावहस्त ॥ ह्रदयद्वारें प्रणव विषयाते ॥ महालिंग अर्पणाते ॥ भोग्यविशेष घडतसे ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ येतेवा इंद्रियरैव सदालिंग सुबुद्धिवान् ॥ गंधा धानंदपर्यंत मनुयाचाति सर्वदा ॥ २३ ॥

॥ टीका ॥ जोइंद्रियद्वारें विषयभोग ॥ तोत्याषड लिंगार्पणा सवेग ॥ हास्वभाविकपणें यथासांग ॥ भोगमार्ग घडतसे ॥ ४४ ॥ षडलिंगाचा जोप्रकार ॥ तोस्वयें महालिंगची साचार ॥ ह्मणूनसर्व भोक्तापरात्पर ॥ असेंजाण पार्वती ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ लिंगदृष्टि निरिक्षंच लिंगहस्तोपि स्पर्शनं ॥ श्रोत्रंविशुद्धलिंगंच जिव्हारसन सर्वदा ॥ २४ ॥

॥ टीका ॥ लिंगाचे नेत्रानें जोपाहे ॥ लिंगहास्तानें पदार्थवाहे ॥ लिंगाचें श्रोत्रें ऐकतराहे ॥ संसारीं तोविमुक्त होय ॥ ४६ ॥ लिंग जिव्हेनें रसचाखें ॥ जोलिंगावीण नच देखे ॥ पाहता पहाणें कौतुके ॥ लिंगसृष्टि अवलोकीं ॥ ४७ ॥

॥ श्लोक ॥ लिंगघ्राणंतु घ्राणंच लिंगस्यवदते तथा ॥ लिंगपदं

गतंवापिइत्यतें सानूभाजयेत् ॥ २६ ॥

५ ॥ टीका ॥ लिंगाच्या घ्राणेंकरूनवास ॥ स्वतायेतअसें परिम-
ळास ॥ लिंगाचरणें चालेंविशेष ॥ लिंगप्रताप असेहा ॥ ४८ ॥
लिंगेंबोलविल्या वेदबोलें ॥ लिंगेंचालविल्या सूर्यचालें ॥ लिंगेंहल
विल्या वायूहालें ॥ सत्ताजाण ईश्वरी ॥ ४९ ॥ लिंगेरचविल्या
ब्रह्मांडरचे ॥ लिंगेखचविल्या ते सर्वखचे ॥ स्थिती नांदबिंदु कारण
साच ॥ लिंगचैतन्य चीअसे ॥ ५० ॥ धरत्रीनें भूतें वाहावीं ॥ पर्वतानीं
स्थानें न सोडावीं ॥ सागरें सिमा न उलंघावी ॥ लिंगसत्ता सर्व
थैव ॥ ५१ ॥ उत्पत्ती स्थिती आणि लय ॥ इच्छामात्रें घडेप्रळय ॥
भक्तिभावें अर्चिता राय ॥ लिंगशक्ति अपारपै ॥ ५२ ॥ लिंगापासून
शक्तिझाली ॥ तेव्हांपृथ्वी स्थितीस आली ॥ ब्रह्माविष्णु ही बाळे ६
व्याली ॥ शक्तिसामर्थ्य अद्भूत ॥ ५३ ॥ कुलालचक्रा माझारीं ॥
चलनकर्ता असेदुरी ॥ मुख्यचक्रास अधारी ॥ तत्वअसे अलिप्त ॥
५४ ॥ तोचीहोय महालिंग ॥ स्वयंभू न चळेअभंग ॥ कर्तालिंग
तो पंचअंग ॥ शक्तिसामर्थ्य तयाअंगीं ॥ ५५ ॥ कर्ताअसून

अकर्ता ॥ तेथेंअसे सर्वसत्ता ॥ हंकार गर्वेवर्तता ॥ विघ्नप्राप्त कार्योंशी ॥ ५६ ॥ ऐशीआत्म विचारमात ॥ शंकरसांगे देवीप्रत ॥ मीआहेसर्वेपि साक्षात ॥ वस्तुमात्रीं निरखीं ॥ ५७ ॥ दृष्टीनें निरखे जोजो जन ॥ तो तो पाहे ऐकेंआपण ॥ जिव्हारस स्पर्शात पूर्ण ॥ भोक्तामी लिंगरूपीं ॥ ५८ ॥ असेसर्वत्र लिंगरूपीं जाण ॥ तेस्वयेंची झालोंअपण ॥ लिंगामज भिन्नपण ॥ नसेजाण पार्वती ॥ ५९ ॥ त्यालिंगाचे पूर्णभक्त ॥ ते मला असेअप्त ॥ तयावेगळामी पुनीत ॥ दुजा न मानीसत्य ॥ ६० ॥ आपणा तयाभेदनाहीं ॥ जैशीभूषणें सुवर्णाठायीं ॥ भानुकिरणा भेदकांहीं ॥ नसेजाण सत्यपै ॥ ६१ ॥ तंतुआणि पटवस्त्रास ॥ मृत्तीका आणिघटांस ॥ आकाश तैसाचअंबरास ॥ भेदनाहीं जाणपा ॥ ६२ ॥ तैसामी लिंगरूपीं भक्तहृदयीं ॥ वसेंसदां निरालंब तत्वाठायीं ॥ लिंगनिष्ठें करून कैलासालयी ॥ अंतींयेती धांवूनिया ॥ ६३ ॥ लिंगभक्ति करितां निकी ॥ स्वलिंगच होतसेतोकी ॥ मगमाझी प्राप्ती एक एकीं ॥ प्राप्तहोय तयाजीवा ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ हृदयं हृदयश्चैव श्रोत्राच्छात्रश्च सर्वदा ॥ स्पर्शनां स्पर्शनंचैव द्रष्टाच दृष्टेवच ॥ २६ ॥ जिव्हांव्यापीच जिंव्हाना घ्राणानां घ्राणमेवच ॥ एकः प्राण समाख्यातो इत्यते सह वर्तिनां ॥ २७ ॥

॥ टीका ॥ आपलेजे निजहृदये ॥ तेची सत्यालिंगाचे होय ॥ आणिश्रवण हें श्रोत्रिय ॥ श्रोत्रलिंग बोलीजे ॥ ६५ ॥ आपलीं त्वकिंद्रियजाण ॥ लिंगाचीं त्वकेंद्रियपूर्ण ॥ चक्षुलिंगींचीं सत्वरखूण ॥ दिव्यतेज असेपै ॥ ६६ ॥ आपले जे केशसुतल ॥ तेची लिंगाचे असेकुंतल ॥ आपली जिव्हारसाळ ॥ लिंगरसना जाणाती ॥ ६७ पाणी आणीचरण नाशीक ॥ वक्तृत्वा रसाळ लिंगादेख ॥ संपूर्ण इंद्रियाचे कौतुक ॥ चालक तो लिंगमूर्ती ॥ ६८ ॥ ध्यानतेंचीं अतः कर्ण ॥ मन साक्ष लिंगप्राण ॥ बुद्धिस्वधमी धारण ॥ लिंग भक्ति लिंगाइता ॥ ६९ ॥ जेजे दिसे दृष्टिकारणें ॥ तेंतें इंद्रिय ल-ज्जीतपणें ॥ सर्वव्यापी लिंगचैतन्य ॥ स्व स्वरूपीं प्रकाशपै ॥ ७० कामक्रोध दंभ हंकार ॥ सर्वत्रअसे लिंगविकार ॥ तया सत्तेचा विस्तार ॥

नवर्णवे सत्यहे ॥ ७१ ॥

७ ॥ श्लोक ॥ लिंगदेही शिवात्मीयो लिंगाचारी न लौकिकेः ॥ सर्वं
लिंग मयं रूपं लिंगेनास्ते सहैवस ॥ २८ ॥

॥ टीका ॥ लिंगाचेपोटीं सृष्टीजाण ॥ हेंबोलणें वेदप्रमाण ॥ सृ-
ष्टी आणिलिंगा ह्मणून ॥ एकची असें रूपतें ॥ ७२ ॥ याकरितां
सृष्टीरचना ॥ हीअसे लिंगरूपजाणा ॥ लिंगावांचून कदांअन्या ॥
लिंगधर्मी नवर्तावें ॥ ७३ ॥ लिंग तोची देहपिंड ॥ तैसेंउद्भवें ब्रह्मां-
ड ॥ शिवधर्माचा दोर्दंड ॥ उद्धारावया जीवाते ॥ ७४ ॥ ऐसेंपरी
लिंगस्थिती ॥ जिकडे तिकडे भव्यआकृति ॥ तयाचे शेवें प्राणी ला
गती ॥ तेउद्धरती सत्वर ॥ ७५ ॥ लिंगमहात्म वर्णावया ॥ वेदशक्य
नोहेजया ॥ लिंगाआणि लिंगधारीकाया ॥ भेदनसे देवीपैं ॥ ७६ ॥ ७
ऐसेंहेशुद्ध मिश्रलिप्तातीत ॥ सर्वप्रकारें विविध पुनीत ॥ श्रुतकरूनिया
पार्वतीकांत ॥ भोक्ता मीचह्मणेंदेवी ॥ ७७ ॥ ही ह्मणजाणून पूजा
करी ॥ त्याचीपूजा मजपावें निर्धारी ॥ त्याचाप्रसाद सफलसुंदरी ॥
निजसुखासी योग्यहोय ॥ ७८ ॥ जोमज नजाणून पूजाकरी ॥

त्याचीव्यर्थ गेली भक्तिसारी ॥ अनंतयुगाचे युगांतरी ॥ शिवभक्त होयपुन्हा ॥ ७९ ॥ तैसीच दुजीऐकगोष्ट ॥ जोस्व पराक्रमें बलिष्ठ ॥ पूजूं पहातसे गर्विष्ट ॥ तीपूजा निर्फलहोय ॥ ८० ॥ आज हे तूजलागी रहस्य ॥ सांगतो सद्भक्तिचेयश ॥ गुरुमुखें अर्चताविशेष ॥ पुण्यघडे जयासी ॥ ८१ ॥ जैसीपूजा तैसेभजन ॥ आवडीक प्रेमेंकरून ॥ आळस नकरिरात्रंदिन ॥ नामस्मरण शिवाचें ॥ ८२ ॥ प्रेमेंटाळी वाजवून ॥ घोषेंअंबर गर्जून ॥ उद्दानकरी पुन्हा नमन ॥ सद्भक्त माझातोची ॥ ८३ ॥ ज्यानीवाहिला हृदयीं लिंग ॥ सावध सोहंमत्रें जपयाग ॥ जन्म शितोदक स्नानभोग ॥ कोहं कोहं शब्दाते ॥ ८४ ॥ जोमंत्र गर्भगर्भी जपेतसे ॥ तयाची जन्मसफल्यता असे ॥ त्याची पूजाअर्चा मंत्रेंविशेषें ॥ जपजाण तोचीपै ॥ ८५ ॥ तेचीसंसारीं धन्यनर ॥ शिवभक्ति करितां अमर ॥ घेऊंपहाती जन्मफेरे ॥ तरीदुर्लभ तयासी ॥ ८६ ॥ इतिश्रीपरम रहस्य सारामृत ॥ टीका करूनिया प्राकृत ॥ कृत कृत शिवलिंगमन्मथ ॥ चतुर्दश मोध्यायहा ॥ श्रीशिवार्पणमस्तु ॥ ८७ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥



॥ श्री भवानीसहित परमेश्वराय नमः ॥ मागे जेंजें निरोपिलें ॥ तेंतें पूर्णब्रह्मची भासलें ॥ पंच तत्वींभरून संचलें ॥ रूपतुझे स्वामीया ॥ १ ॥ खूणगूज ब्रह्मांडाची ॥ शक्तिनसे अन्यदेवाची ॥ सत्तासर्व असेतुमची ॥ कर्तातूंचि ईश्वरा ॥ २ ॥ आतांपंच दशमोध्यायीं ॥ कथारसाळ श्रवणाठायीं ॥ वदाह्मणूनी लागेपायीं ॥ प्रेमाश्रू नयनींढळे ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ देव्युवाच ॥ जीवैदेहावरित्यक्ता कस्मात्तालिंग प्रळयं ॥
लिंगस्य षडविधंप्रोक्तं ब्रूहीमेपरमेश्वर ॥ १ ॥

॥ टीका ॥ पार्वतीह्मणे शिवाप्रती ॥ तुह्मीनिरोपिले पंचलिंगांती ॥ महालिंगजया बोलती ॥ तेथें लिप्तसर्वलिंग ॥ ४ ॥ परिदेहाअंती सर्वजीव ॥ कोणत्या लिंगाठायीं सामाव ॥ तेसांगावें मजलाघव ॥ जगदोध्दाराकारणें ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ पंचेंद्रिय मुखंज्ञात्वा पदार्थंच समर्पितं ॥
तल्लिंगमनुतेयस्तु तस्मैलिंगप्रलीयेते ॥ २ ॥

॥ टीका ॥ पांचलिंग ज्यालिंगा भितरीं ॥ तोपांचविषय भक्ता

अवधारी ॥ जोभोग भोगून सर्वांतरी ॥ अभोक्ताची असेजो ॥ ६ ॥
तो महालिंग सर्वगतअसे ॥ देहांतीं जीवतेथें समरसे ॥ परिअंत-
काळीं स्मरणवसे ॥ तरीचपावें महालिंगासी ॥ ७ ॥ जोमहालिंगीं
समाधीलावी ॥ तोजन्ममृत्यु लागीचुकवी ॥ शिवस्मरण दृढपढवी ॥
जाणतोची विमुक्त ॥ ८ ॥ अंतकाळींची अठवण ॥ होणेंनसे
अभ्यासावीण ॥ नित्यनेमें प्रेमेंभजन ॥ सुषुप्तिजाग्रती जो ॥
९ ॥ तयाचेहोय साध्यसाधन ॥ स्वरूपींराहे सावधान ॥ नाना
परीचेभोग त्यजून ॥ नामस्मरणीं रतसदा ॥ १० ॥ सर्व विषय
भोगभोगून ॥ अंतकाळीं सावधराहीन ॥ शिवमहालिंगाचें स्मरण ॥
करीन जाणआवडी ॥ ११ ॥ तरीहें न घडें सर्वथा ॥ इंद्रियाते नजा-
ळीतां ॥ असाध्य असेतत्वता ॥ नघडे काळत्रयीं ॥ १२ ॥ अंत
काळाचे वेळीं गडबड ॥ जठराग्नी पेटघे भडभड ॥ तेव्हां पोटदुखे
मुख्यप्रचंड ॥ चैननसें तेथेंपै ॥ १३ ॥ तोअकस्मात विझेजव्हां ॥
अभ्यंतरी धूरेदाटें तेव्हां ॥ तेथें सावधहोऊन स्मरेकेव्हां ॥ भ्रमभूत
होतअसे ॥ १४ ॥ जेथेंअंधारें धूरदाटें ॥ तेथें सावधराहणें खोटें ॥

मनबुद्धि भ्रमेंवेष्टे ॥ स्मरण कैसेहोये ॥ १५ ॥ अंतकाळीं अतिघाबरे पणें ॥ आसन घालूनबैसे कोण ॥ नसाधेतें योगध्यान जाण ॥ व्यर्थ होय जन्मत्याचा ॥ १६ ॥ यालागींदेवी अखंडध्यान ॥ करावेंलागे ज-न्मापासून ॥ तै अंतकाळीं होयस्मरण ॥ मुक्तहोय प्राणीतो ॥ १७ ॥ जेवींजाग्रतमन जेथेंथोकें ॥ तेंचींस्वप्न वासनात्मक देखे ॥ अंतकाळीं अठवण नचुके ॥ स्मरणहोय शिवाचे ॥ १८ ॥ या-लागी अखंड ध्यान अभ्यास ॥ तोचीयोग पुढें येसमयास ॥ तेव्हांजीव शिवाते समरस ॥ होतीजाण महालिंगीं ॥ १९ ॥ अंतकाळीची दुर्धर व्यथा ॥ अभक्तासी होयतत्वता ॥ निजभक्ता नोव्हेसर्वथा ॥ मृ-त्युपंथीं प्राणीया ॥ २० ॥ मरणा मारूण सावकाश ॥ मृत्युंजय कृपाअविनाश ॥ तयाअंती नलगेप्रयास ॥ दुखः नसे देवीतया ॥ २१ ॥ निराकार गुरुपदाचीखूण ॥ जयाप्रयाण कालीं आठवण ॥ तरीतेचीहोय चैतन्यघन ॥ परब्रह्म तत्वातें ॥ २२ ॥ देहसुखाची जीआशा ॥ तीपूर्णहोता हर्षेंमनिशा ॥ आनंदेंनाचें पूर्णप्रकाशा ॥ सार्थकसर्व मानितसे ॥ २३ ॥

२ ॥ श्लोक ॥ प्रयाणकाले कालेच लिंगभोगोप भोगिनां ॥ आर्पितं सावधानेन स्वलिंगी प्राणनायकं ॥ ३ ॥

॥ टीका ॥ लिंगभोगी जो भक्तपूर्ण ॥ लिंगरूपीं झालाआपण ॥ तोअंतकाळीं सावधान ॥ संशय कासया धरावा ॥ २४ ॥ जैसा जन्मता सावधान ॥ तयाअंतकाळीं घडेविस्मरण ॥ तरी केलेंकष्ट व्यर्थजाण ॥ जन्मायेऊन व्यर्थअसे ॥ २५ ॥ नरदेह जन्मउत्तम ॥ परि सद्वर्तनाचा नेम ॥ जोपुरुष सदासप्रेम ॥ शिवभक्ती करितसे ॥ २६ ॥ तोची या यातनेंतून ॥ दूरअसे भक्तजन ॥ त्याची खुंटली-जाण ॥ अविद्याची साचपै ॥ २७ ॥ जोआत्माआत्म विचारकरी ॥ त्यासप्राप्तहोय माझारी ॥ रिधिसिधी मंगळेश्वरी ॥ राबत रहाती तेथें ॥ २८ ॥ सर्वभूताचें भूतविशेष ॥ आपणा जाणिल्या अवेश ॥ दयाशांती च्याराशीस ॥ खर्चसदा करीकां ॥ २९ ॥ तोपुरुष शिवचीझाला ॥ ब्रह्मीचा अधिकारत्याला ॥ प्रतीईश्वर बोलीजेला दयाशील ह्मणूनि ॥ ३० ॥ असोआतां मोक्षमार्ग ॥ कैसाआहे तोअपवर्ग ॥ सर्वशक्तिचा संसर्ग ॥ प्राणहात्या ईशकृपें ॥ ३१ ॥ २

साक्षअसती बहुत ॥ यातशिवयोग शिवधर्मांत ॥ साधावा शैवानि-
र्भ्रांत ॥ आळसामागे टाकुनी ॥ ३२ ॥ क्रियमाण क्रियाजीघड-
ती ॥ तीमहालिंगाप्रति अर्पिती ॥ अकर्तेपणें कर्मासामावती ॥
तीक्रियादेहाची नियोग ॥ ३३ ॥ देहासंबधीं जीजी क्रियाघडे ॥
तेंसुख दुःख भोगवें रोकडे ॥ नमानीआपले कर्म साकडे ॥ ईश्वरी
इच्छाभावी तेसें ॥ ३४ ॥ असोहे अंतकालीचे क्लेश ॥ निजभक्त लागू-
नि नेदीसर्वेश ॥ दूरकरीतयाचा भवपाश ॥ शिवभक्ति कारणें ॥ ३५

॥ श्लोक ॥ प्राणलिंगीनालोकंच लोकाचार विवर्जितं ॥ लोकमार्गे
तश्चैव प्राणलिंगतुसमश्रुतं ॥ ४ ॥

॥ टीका ॥ प्राणलिंगी जोपुरुष ॥ तयास लोकोपदेश ॥ लो-
काचार नावडेत्यास ॥ तत्वीं रत सदातो ॥ ३६ ॥ तोतिन्ही लोका
वर्जीत ॥ त्याचा उपभोगींहेत ॥ नसेजाणतें स्वाहित ॥ अन्य खट-
पट व्यर्थ ॥ ३७ ॥ तयाम्रतिका समान कांचन ॥ गारेसमान मा-
नी रत्न ॥ स्त्रीपुरुषा भेदपण ॥ अभेद मानीसर्वातो ॥ ३८ ॥
अभेदकारितां क्रियाराहे ॥ असेधर्मशास्त्र प्रसिद्धआहे ॥ परीस्वज्ञाती

परभेदशाहे ॥ अलिंगीस्पर्श करूंनये ॥ ३९ ॥ अलिंगीस्पर्श होता
जाण ॥ तत्कलिक करावेंस्नान ॥ क्रियाकरा देहींझिझून ॥ तो-
चीधन्य संसारीं ॥ ४० ॥ जोतिन्ही लोकाचें सुखात्यागी ॥ कष्ट
करून दुःखाते भोगी ॥ जेसदारहोणें विरागी ॥ तेदुर्लभ जाण देवी ॥
४१ ॥ हा गजआणि तोमश्यक ॥ परीपूर्णजाणें ब्रह्मादिक ॥ स-
र्वप्रकारें भक्ताएक ॥ अभेदजाण लिंगभक्ती ॥ ४२ ॥ कोणाचीस्तु-
ती किंवा निंदा ॥ नकरावी संकटींकदां ॥ तोयोग्य होयमुक्ति-
पदा ॥ मूर्तिमंत मुक्ततो ॥ ४३ ॥ ऐसीही मुक्तानित्य मुक्तलक्षणें ॥
शिवरूपें पार्वती एकजाणें ॥ गुरुभक्ता कौतुक देखणें ॥ सत्शिष्य
जाणतो ॥ ४४ ॥

॥ श्लोक ॥ सद्भावं सद्गुणंचैव स्वधर्मसावधानकं ॥ सद्वस्तु न
वेदंचैवं तत्रातिष्ठामि पार्वती ॥ ५ ॥

॥ टीका ॥ शंकरह्मणें पार्वतीप्रती ॥ जोसद्भावें अर्चे प्रेमस्फूर्ति ॥
तयाचेगर्भ वासचुकती ॥ स्वधर्मानिष्ठें करूनिया ॥ ४५ ॥ जेद्गुणें करू
न सत्यवादी ॥ तयामुक्तासीच नसेबंदी ॥ तोप्राणीअसें जगीआनंदी ॥

आवतारची ह्मणावा ॥ ४६ ॥ स्वधर्माचा महिमाअत्याद्भूत ॥ पारि
निष्टारहावी प्रेमेंभरीत ॥ तेथेंकळीकाल होयलज्जीत ॥ शिवनिष्टें क-
रूनी ॥ ४७ ॥ येणेंकरून भक्तजना ॥ सदामुक्त जीतजाणा ॥
नित्यमुक्त तयाना ॥ ह्मणतात जाणपा ॥ ४८ ॥ ऐसेहे निजगुह्ये
वर्धक ॥ त्वाश्रवण केले स्वभाविक ॥ देश काल व युगे अनेक ॥ मीसदा
स्वयंभू ॥ ४९ ॥ जेजेभक्त भाविकशुद्ध ॥ तयाकरणें नलगेबोध ॥
तेस्वधर्माचेंच विविध ॥ आचारज्ञान वर्तती ॥ ५० ॥ तयाजे मानी-
तीआप्त ॥ तयायातना नहोयप्राप्त ॥ शिवपदालागी अव्यक्त ॥ भक्त
असे तोहीपै ॥ ५१ ॥ व्यक्तभक्ताचीजी ओळख ॥ लिंग भस्मधारण
देख ॥ अक्षमालाभरण सुरेख ॥ शोभतसे प्राणीतो ॥ ५२ ॥
लिंगधारण इतरानाहीं ॥ त्यानीपार्थिव पूजावेंपाही ॥ अथवा बाणमू-
र्तिची कांहीं ॥ पूजाकरीती आदरें ॥ ५३ ॥ आतांएक्य रूपाची
खुण ॥ तुजलागीं देवीसांगेन ॥ एक्यत्वाकैसी मिळवण ॥ प्राप्तहो-
ती भक्तजणा ॥ ५४ ॥ लिंगधारण नाहींज्यास ॥ लिंगधारीचा घडे
सहवास ॥ तेव्हांआलिंगी शुद्धपदास ॥ पावेजतो येणेंस्पर्शे ॥ ५५

तैसेच भस्माचा गुण ॥ भस्मवीरशैवाचें पावन ॥ तेअत्यादरें स्पर्शन ॥ होतातुटती जन्मफेरे ॥ ५६ ॥ वीरशैव भक्तिसविस्तर ॥ ४
पाहुजाता तोची विचार ॥ अन्या नसाध्य हाप्रकार ॥ मुळक्रिया शुद्धपै ॥ ५७ ॥ रुद्राक्ष परिधानाची गोडी ॥ जयाअसे परमआवडी ॥ तोहीपावें कैलासभवंडीं ॥ शिवचिन्हे करूनिया ॥ ५८ ॥
शिवचिन्हाची थोरवीमोठी ॥ नर्वणवें कोणासंपुटी ॥ धारणकरितां शंकरभेटी ॥ उटाउटी घडतसे ॥ ५९ ॥ ह्मणून शिवमहात्म अत्युतमे ॥ देव वर्णितीसदा नेमें ॥ ऐसाहामार्ग अतिसुगमे ॥ परि अभावीका नावडे ॥ ६० ॥ जेविषय विषासमान मानिती ॥ ज्यानींत्यागिली तत्क्षणी अहंकृती ॥ त्याचेहृदींमी शूलपाणी निश्चिती ॥
सदा रहातो अवडी ॥ ६१ ॥ ज्यानेंउदासवृत्ती त्यजून ॥ सदानंदें ४
करूनमन ॥ कालमृत्युते विसरून ॥ माझेंभजनीं सावध ॥ ६२ ॥
तेथेंमी अहोरात्रवसे ॥ सर्वभूतगण परिसे ॥ अष्टमासिद्धि अविनासे ॥ राबती भक्तामंदिरीं ॥ ६३ ॥ एकविधभक्ति प्रेमेंकरी ॥ भूतदया युक्तजो अंतरीं ॥ तेथेंवसतसे त्रिपुरारी ॥ अन्याठायी कदांनसे ॥ ६४

नाअवडे कैलासवास ॥ कैलासी मीअसे उदास ॥ निजभक्तागृहीं संतोष ॥ सदानंदें डुल्लतसे ॥ ६५ ॥ ज्यानींआपला जन्मसाफल्य ॥ करण्याकरितां तपेंतपलें ॥ ते जन्ममरणातें चुकलें ॥ सत्यजाण पार्वती ॥ ६६ ॥ प्रेमेंनित्यनाम माझेंघेतां ॥ तोमद्रूपची होयतत्वता ॥ तोचीअधिकारी मोक्षपंथा ॥ इतरालाभच नोहेतो ॥ ६७ ॥ वेद शास्त्रेंसांगती युक्ती ॥ जीवेंकरावी शिवभक्ति ॥ तेथें कलीकालाची नसेशक्ति ॥ महिमा अद्भूतअसे ॥ ६८ ॥ धर्मअचरून मोक्षालागी आला ॥ तोमजप्रती अक्षयपावला ॥ पुनर्जन्माचे फेऱ्याचुकला ॥ मुक्तझाला भक्तिभावें ॥ ६९ ॥ असेमुक्त सद्भक्त मजपावती ॥ तेपुढें शिवभक्तची आवतरती ॥ यमपाश तोडूनजीव उद्धरती ॥ प्रति सृष्टि कर्तेंजे ॥ ७० ॥ तोस्वइच्छे करूनवर्तें ॥ भक्तिउत्कंठा प्राप्त कर्तें ॥ देवादिक लज्जीततेथें ॥ ज्ञानशक्ति पाहूनी ॥ ७१ ॥ ही मोक्षाची परमगती ॥ तूजकथीली पार्वती ॥ यमलोकीची कैशीस्तिती ॥ ऐकआतां सावधपणें ॥ ७२ ॥ जोअभक्त खलदुर्जन ॥ निंदीसद्भक्ताचें वचन ॥ अमानीधर्म नीतिजाण ॥ कुमार्गी रतसदा ॥

७३ ॥ धर्मनियम तोडूनपाही ॥ स्वमत्ताचार मिरवीकांहीं ॥ पाखं-
६ डमत्तस्था लवलाही ॥ स्वधर्मास त्यजवी ॥ ७४ ॥ दुर्वासनें वर्ते
आपण ॥ तैसेच करवीरोखून ॥ तयावश्य नहोताजाण ॥ खोड-
तोडी दुष्ठतो ॥ ७५ ॥ जन्मोजन्मीं चालताधर्म ॥ त्यागून पाळवी
आधर्म ॥ प्रसिद्ध सोडूनखूण नाम ॥ दुजेसांगे वर्तावया ॥ ७६ ॥
स्वज्ञातीची करीनिंदा ॥ नमानीत्याचें वचनकदां ॥ यमाझिडकावी
त्याच्याफंदा ॥ धरून पाशी नेतअसे ॥ ७७ ॥ धर्मावरनिष्ठा न-
सेज्यासी ॥ कुंभपाकादी शिक्षात्यासी ॥ कांचरसाचे कुंडापाशी ॥
नेती स्नानकरावया ॥ ७८ ॥ कांचरसाचे होतास्नान ॥ नसाहे या-
तना कठीण ॥ धर्मभ्रष्ठातेची शुद्धिजाण ॥ अग्नितीव्रें भाजी-
ती ॥ ७९ ॥ यमपूरीचें दुःखफार ॥ निर्दयपणें अनिवार ॥ ठोकिती ६
पाडिती किंकर ॥ नवर्णवें दुःख तें ॥ ८० ॥ यमराजाच्या सभेआं-
त ॥ हजरसभा असे विख्यात ॥ तेथेंतिष्ठविती समस्त ॥ प्राण्या
लागी नेऊनी ॥ ८१ ॥ तेथेंत्याची झाडाझडती ॥ पुण्यपापाची
फेडितभ्रांती ॥ शिक्षेकरितां योग्यहोती ॥ तयाताडीती शस्त्रघायें ॥

 

८२ ॥ आग्निस्तंभा भेटवून ॥ सर्वेचीकरविती वृश्चिकदंशन ॥ तीक्ष्ण शस्त्रें टाकितीछेदून ॥ पुनर्जन्मा पाठविती ॥ ८३ ॥ जन्मघेता झडकरी ॥ आणिती नर्ककुपाभितरीं तेथेंबुडवीती चंद्रार्कवरी ॥ पुढेंकाढीती भोगावया ॥ ८४ ॥ हीझालीअसे पातकनिती ॥ परिसमान पुण्याचीस्थिती ॥ मनुष्यजन्माते पाठविती ॥ पुण्यअर्चन करावया ॥ ८५ ॥ जेपुण्यवान् चुकून नेती ॥ तयाआदरे नर्वेपूजीती ॥ अपराधाची क्षमा मागती ॥ अराध्यपुसिती उपासना ॥ ८६ ॥ तेस्वधर्मी पुण्य प्राण्यास ॥ विनये भोगवि विलास ॥ पुण्यक्षयझाल्या विशेष ॥ ढकालिती मृत्युलोकीं ॥ ८७ ॥ ऐसीही स्वधर्म पुण्याचभीति ॥ यमादिकाअसे बाधकशक्ति ॥ पुण्याचामहिमा देवजाणती ॥ वाखाणीति बहूसाल ॥ ८८ ॥ यास्तव स्वधर्माचारे वर्तता ॥ विशेषपुण्य प्राप्ति होयतत्वता ॥ आचारा प्रतिपाल प्राणसमजता ॥ पुण्यजोडे खरेतें ॥ ८९ ॥ शास्त्राज्ञेनें जेंघडे आचरण ॥ तेंपुण्यअसें वज्रासमान ॥ यरवीं तें फोल निर्बळजाण ॥ न टिके निर्फलअसें ॥ ९० ॥ स्वधर्माचरणाचें यश ॥ पदच्यूत करीशक्रास ॥ इच्छापूर्ण फल

६

प्राप्तिस ॥ जेकरितीते अल्पपुण्ये ॥ ९१ ॥ माझेजे परमशिवभक्त ॥
तयाचे आचार धर्माचेपंथ ॥ सूक्ष्मअसती विख्यात ॥ तयाचेपुण्य
बज्रासम ॥ ९२ ॥ जेमज आठविती दिनरात्रीं ॥ जेणेंअर्चिलें
पंचाक्षरमंत्रीं ॥ यागसाधक साधनपरत्रीं ॥ नजुमानती यमादिका ॥
॥ ९३ ॥ यमतयाशैवा येतशरण ॥ जेका लिंगधारी भस्मचिन्ह ॥
आणिकरिती रुद्राक्षाभरण ॥ तेपावन ब्रह्माकिका ॥ ९४ ॥ एक-
निष्ठे एकाभावेंकरून ॥ तोदेवाधिदेवा परिजाण ॥ गुरुअज्ञा क्रिया
करीपूर्ण ॥ तोउद्धरी बहुजीवा ॥ ९५ ॥ ऐसाजो गुरुकृपेजन ॥
तयाचें चुकेभवबंधन ॥ मुक्तहोऊन उद्धस्तीआपण ॥ निभ्रांतपणें जा-
णपे ॥ ९६ ॥ इतिश्री परमरहस्य सारामृत ॥ टीकाकरूनिया
प्राकृत ॥ मन्मथ शिवलिंगकृत ॥ पंचदशमोध्याय संपूर्णमस्तु ॥ ९७
शुभंभवंतु ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ ६

॥ श्रीगुरु परब्रह्मणे नमः ॥ पंचदश मोध्यायपर्यंत ॥ कथीले र-
हस्य आमित ॥ ऐकूनसद्गद झालेंचित्त ॥ पार्वतीह्मणे शिवाप्रती ॥
२ ॥ शिवाचार धर्माची प्रसिद्धि ॥ कवण्याआच्यार्यांनें केलीवृद्धि ॥
तींप्राप्त नामें मजनिवेदी ॥ कृपाकरूनि स्वामिया ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥ अतः परंप्रवक्षामि पंचाचार्य समुद्भवं ॥
तेषांनामानि देवीत्वं श्रुणूनिश्चल मानसा ॥ १ ॥

॥ टीका ॥ शंकरह्मणे देवीप्रती ॥ तुझाप्रश्न आचार्यउत्पत्ती ॥
श्रवणतत्पर शुद्धचित्तीं ॥ सादरजाण असावें ॥ ३ ॥ आदीसांगेन
आचार्याचेंनाम ॥ पुढेंकथीलें आवतारग्राम ॥ स्वयंभवागमीं विस्तार
नेम ॥ असेजाण पार्वती ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ एकोरामः पंडितार्यस्तथा रेवणसिद्धराट् ॥ तथामरूळ
सिद्धेशो विश्वाराध्या इतिक्रमात् ॥ २ ॥

॥ टीका ॥ एकोराम आणि पंडितार्य ॥ हेआवतार भूवरीगुरुवर्य ॥
वीरशैवधर्मी सर्वकार्यें ॥ अज्ञेप्रमाण घडतसे ॥ ५ ॥ रेवणसिद्ध प्रसिद्ध
गुरु ॥ जेणेंकथीलासें शास्त्राचारु ॥ वीरशैव धर्माचा विस्तारु ॥

सिद्धांत दाखविलापै ॥ ६ ॥ मरुळासिद्ध नामेंसाचार ॥ प्रगटले माझेंनामधार ॥ तेणेंकेला जगउद्धार ॥ भक्तिज्ञान जाणेंतो ॥ ७ ॥ विश्वाराध्य महागुरु ॥ सर्वातश्रेष्ठ अधिकारु ॥ गुरुत्वाचा विचारु ॥ प्रगटकरी वेळोवेळां ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ एकोरामस्य जनन मावासस्तु हिमालये ॥ द्राक्षारामे रामनाथे लिंगेयुग चतुष्कये ॥ ३ ॥ सुधाकुंडाख्य सुक्षत्रे लिंगेश्री मल्लिकार्जुने ॥ जननपंडितार्यश्च निवासश्श्रीगिरौशिवे ॥ ४ ॥ तथा रेवणसिद्धस्य कोल्लिपाके पुरोत्तमे ॥ सोमेशालिंगेजनन मावसः कदली पूरे ॥ ५ ॥ तद्वन्मरुळसिद्धस्य वटक्षेत्रे महत्तरे ॥ सिद्धेशेलिंगे जननं स्थानमुज्जयनिपूरे ॥ ६ ॥ काशांविश्वेश्वरेलिंगे विश्वाराध्यस्यसंभवः ॥ स्थानं श्रीकाशिकाक्षत्रे श्रुणूपार्वती सादरं ॥ ७ ॥ कृतायुगचतुष्केते पंचाराध्य यथाविधि ॥ ममपंचमुखोद्भूता संस्थाप्य लकशान्भुवि ॥ ८ ॥

॥ टीका ॥ एकोरामाचें आवतारस्थान ॥ हिमालयीं प्रसिद्ध रुद्राक्षवन ॥ रामनाथनामे लिंगामधून ॥ उत्पन्नझाले प्रथमयुगीं ॥ ९ पंडितआर्य प्रगटस्थान ॥ सुधाकुंडनामें क्षेत्रजाण ॥ मल्लिकार्जून

लिंगांतून ॥ पीठस्थराहे श्रीशैलीं ॥ १० ॥ वीरधर्म प्रातिपाळक प्रसिद्द ॥ अवतरलेसत्य रेवणसिद्द ॥ कोलीपाकनगरा भितरींशुद्द ॥ सोमेशालिंगीं उद्भवले ॥ ११ ॥ तेथूननिघाले सत्वरवना ॥ गुरुत्वाधि काराचेंज्ञाना ॥ जाणेंसर्व व्यक्तिच्याखुणा ॥ उपदेशी शैवधर्माते ॥ १२ ॥ त्यांनींआपलेतें सिंव्हासन ॥ रंभापूरयेथें स्थापून ॥ वीरशैवधर्मा प्रगटून ॥ शिक्षाकरी धर्मभ्रष्टा ॥ १३ ॥ वटक्षेत्रीं आवतार होता ॥ चरणीं पावनझाली माता ॥ उद्भव सिद्देश लिंगींतत्वता ॥ सिंव्हासन उज्जानियेथें ॥ १४ ॥ तेची मरुळाच्यार्य विस्यात ॥ शिवअज्ञेनें मृत्युलोकांत ॥ वीरशैवधर्मा संरक्षीत ॥ महा ज्ञानी जाणतो ॥ १५ ॥ विश्वेश्वर अराध्यगुरु ॥
काशीका क्षेत्रीं पिठाचारु ॥ विश्वेश्वरलिंगीं संचारु ॥ अज्ञजना कारणें ॥ १६ ॥ पार्वतीप्रश्नकरी शिवाप्रती ॥ हेआचार्य आवतार सांगाकिती ॥ युगसंख्या कोणतेधर्मस्थिती ॥ कैसीअसे चराचरी ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ यदायदाप्राण शिवैक्यभोजा हनिर्भवे भूमितलेगणशाः

॥ तदातदामर्त्यं कुलेंवतीर्यं संभूयकुर्वंतिहि धर्मसस्थां ॥ ७ ॥

॥ टीका ॥ शंकरसांगे आंबेऐक ॥ माझेपांच जे गणनायक ॥ महापराक्रमीं दारुक ॥ वीरशैव धर्ममूर्ति ॥ १७ ॥ तयाचेपरी रेणूकजाण ॥ धर्मरक्षणा साटी निर्माण ॥ होता तात्काळ नलगेक्षण ॥ प्रतिसृष्टि करतेंजे ॥ १८ ॥ ऐसेहेएका मागूनएक ॥ आवतीर्य कैलासनायक ॥ वीरशैवधर्मा प्रतिपालक ॥ सिक्षादेत धर्मभ्रष्टा ॥ १९ ज्याकाळीं लिंगाईत धर्महानी ॥ त्याकाळींसर्वधर्म लयाजाऊनी ॥ अधर्मवाढे सततमेदिनी ॥ धर्मविचार नसेकोणा ॥ २० ॥ स्वधर्म सांडूनियाजाण ॥ करितीअधर्म मंडण ॥ तेणें पुण्यक्षय होऊन ॥ दरिद्रता प्राप्तहोये ॥ २१ ॥ अधर्म जाहालिया सृष्टी ॥ कदानोहे पर्जन्यवृष्टी ॥ तेंव्हांकैलाशी येऊनिपरमेष्ठी ॥ प्रार्थितसे शिवालागी ॥ २२ ॥ ह्मणेअधर्म वाढलामहिवरी ॥ प्रजाजर्जरसर्व निरअहारी ॥ तयाचेसंकट त्वरितनिवारी ॥ कृपादृष्टी करुनिया ॥ २३ ॥ तेंव्हांशिवअज्ञा करीगणाशी ॥ तुह्मीत्वरेंजावें मृत्युलोकाशी ॥ सर्वधर्म चालते ज्याचेत्यासी ॥ कीजेसत्य यावेळीं ॥ २४ ॥ वीरशैवधर्म परम-

पावन ॥ तयाचीवृद्धि आधिकारितांजाण ॥ दुजेधर्म वाढाया कारण ॥ हेचीमुख्य साधनपे ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ प्रत्यकंच प्रवक्ष्यामि प्रतिनामानिचश्रृणु ॥
॥ सद्योजात मुखोत्पन्नो दारुकः परिकीर्तितः ॥ ८ ॥
॥ तन्नमरुळाराध्य तस्यसूत्रंच वृष्टिकं ॥
॥ प्रवरोवीरशैवेति अतिवर्णश्चवर्णकः ॥ ९ ॥
॥ तस्यदंडश्च पालाश तथाताम्र कमंडलुः ॥
॥ नकारोमंत्रबीजंच शकदारुक ईरितः ॥ १० ॥
॥ कलशतस्य ताम्रश्च सद्योजात मुखंतथा ॥
॥ तस्यकंथाच मांजिष्ठालक्षणं नंदीगोत्रीणां ॥ ११ ॥

॥ टीका ॥ शंकरह्मणे देवीप्रती ॥ ऐकसद्योजात मुखोत्पत्ती ॥ दारूकनामें गणाचीकीर्ति ॥ नवर्णवे सांगावया ॥ २६ ॥ तेचीहे मरुळासिद्ध नामधार ॥ वृष्टिसूत्रीक वीरशैवप्रवर ॥ चहुवर्णाहून श्रेष्ठतर ॥ अतिवर्ण जाणावा ॥ २७ ॥ तयाचा ताम्रअसेकलश ॥ सुदृढदंड ज्याचापालाश ॥ मंत्रबीज उच्चारविशेष ॥ गोत्रनंदी

३ असेपै ॥ २८ ॥ शाखातयाची ह्मणसीकोण ॥ तरीतीअसे दारुक जाण ॥ कमंडलु मेखला शोभायमान ॥ कांतिप्रकाशे अवनीवरी ॥ २९ ॥ तपोतेज मंत्राधिक ॥ महामुनि वंदितीदेख ॥ कटीकौपीन यशदायक ॥ कालाशासन करीनेमें ॥ ३० ॥ यालक्षणें करूनयुक्त ॥ भस्मरुद्राक्ष सुशोभित ॥ लिंगसज्जीका विलसत ॥ हृदयावरी तयच्या ॥ ३१ ॥ हाचीहोय प्रथमाचार्य ॥ सर्वाजगी हा होयआर्य ॥ लिंगधारीचे गुरुवर्य ॥ असेजाण देवीपै ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ वामदेवमुखोत्पन्न शंकुकर्णोतिनामतः ॥
॥ एकोरामेनितन्नम तस्यसूत्रंच लंबकं ॥ १२ ॥
॥ प्रवरो वीरशैवेति अतिवर्णश्च वर्णकः ॥
॥ वेणूदंडस्तु स्तस्यास्ति तथाकांश कमडंलुः ॥ १३ ॥ ३
॥ मकारोमंत्रबीजंच शंकुकर्णशकस्मृतः ॥ कलशस्तस्य
कांशश्चवामदेव मुखंतथा ॥ १४ ॥ हरिततर्णतस्य
कंथा लक्षणं भृंगीगोत्रिणां ॥ १५ ॥

॥ टीका ॥ शिवह्मणे गिरीजासुंदरी ॥ माझेंवामदेव मुखाभितरीं ॥

पंडिताराध्य तेअवधारी ॥ एकाएकी अवतरले ॥ ३३ ॥ तयाचें सूत्रअसे लंबक ॥ द्वितीयप्रवरी वीरनायक ॥ अतिक्रमूण वर्णाचला रीक ॥ वंद्यपूज्य देवादिका ॥ ३४ ॥ वेणूदंडपरीकर करी ॥ काळा शिक्षादे भिडनधरी ॥ वीरशैव धर्माचा कैवारी ॥ धर्मरक्षक जाणतो ॥ ३५ ॥ नादरूपी कांशपात्रीं ॥ धारणकरी लिंगगात्रीं ॥ कंठींबिजोखार लयनेत्रीं ॥ तपालागी सिद्धअसे ॥ ३६ ॥ जयाचीमेखला असे-हरित ॥ शंकुकर्ण शाखे ते वेष्टित ॥ भृंगीगोत्रीं परमपुनित ॥ विश्वलज्जीत असेतेथें ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ अघोराख्य मुखोत्पन्नो रेणुकः परिकीर्तितः ॥ तन्नामरेवणाराध्य सूत्रंपढवाड इत्यपि ॥ १६ ॥ वीर शैवेतिप्रवरो ह्यतिवर्णश्चकर्णकः ॥ कमंडलुश्च रजतः अश्वत्थोदंडईरितः ॥ १७ ॥ राजतः कलशतस्य ह्य-घोरमुख मीरितं ॥ तस्यस्वेतमयी कंथालक्षलं वीरगोत्रीणां ॥ १८

॥ टीका ॥ तिसरे माहेश्वरगुरु ॥ अघोर मुखांपासून निर्धारु ॥ रेवणसिद्ध योगेश्वरु ॥ प्रगटझाले भूलोकीं ॥ ३९ ॥ पडवीड

४

सूत्र जयाचे ॥ त्र्यक्षरप्रवर सुवाचे ॥ मंत्रखुर्खीबीज घोषाचे ॥ उ-
च्चारजाण होततसे ॥ ३९ ॥ कलशरौप्याचा लखलखींत ॥ हस्ता-
चेठायीं दंडअश्वत्थ ॥ प्रवराचीकीर्ति विराजीत ॥ सत्यधर्मं जाण-
तो ॥ ४० ॥ ऐसाहा वीरशैव पुत्र ॥ तयाचेअसे वीरगोत्र ॥
मंत्रजप अहोरात्र ॥ वदतसे वदनींपै ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ तत्पुरुषमुखोत्पन्नो धेनुकर्णेति नामतः ॥
तस्यनाम पंडितार्य स्तत्सूत्रं मौक्तगुच्छकं ॥ १९ ॥
प्रवरोवीरशैवेति अतिवर्णश्च वर्णकः ॥ न्योग्रोधस्तस्य
दंडोस्ति लोहं तस्यकमंडलुः ॥ २० ॥ वकारोमंत्र
बीजंच गोकर्णशकहरितः ॥ कलशतस्य लोहस्यात्त
त्पुरुषमुखंस्मृतं ॥ २१ ॥ तस्यकंथाच कापोति लक्ष-
णं वृषगोत्राणां ॥

॥ टीका ॥ तत्पुरुषमुखां पासून ॥ उत्पन्नशाले पंचानन ॥ जया
नाम धेनुकर्ण ॥ पंडितार्य बोलतीत्या ॥ ४२ ॥ मुक्तगुच्छसूत्राचा
अधिपति ॥ महासूत्रीं जयावंदिती ॥ उपसूत्रें द्वादश शोभति ॥

४

 

तयाअचार्या जाणावें ॥ ४३ ॥ प्रवरअसे तयाचा चतुर्थ ॥ धर्मज्ञा सच कळेअर्थ ॥ शिवानिंदकास सिक्षायथार्थ ॥ करीनेमें जाणतो ॥ ४४ ॥ वर्णजयाचा असेश्रेष्ट ॥ नमानिकोणाचें मत्तवरीष्ट ॥ वीरशैवधर्मालागी बलिष्ट ॥ न्योग्रोधदंड धरीयला ॥ ४५ ॥ लोहमय कमंडलु सुरस ॥ चतुर्थ अक्षरींविशेष ॥ मंत्रबीज महातेजस ॥ सदाजपे मुखामाजी ॥ ४६ ॥ जयाचीशाखा गोकर्ण ॥ कलशअसे लोहवर्ण ॥ करीसदा भस्मचर्चन ॥ बिल्वपूजा इष्टलिंगां ॥ ४७ ॥ यर्णेपरी लक्षणयुक्त ॥ वृषभगोत्र जयाशोभत ॥ सर्वदेवाहून प्रभूत ॥ असेजाण वरानने ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ ईशानास्य मुखोत्पन्नो विश्वकर्णेति विश्रुतः ॥
विश्वाराध्यश्च तन्नामतत्सूत्रं पंचवर्णकं ॥ २२ ॥ वीरशैवेति
प्रवरो ह्यतिवर्णश्चवर्णकः ॥ दंडोबिल्वइतिप्राक्तः सौवर्णश्च
कमंडलुः ॥ २३ ॥ एकारोमंत्रबीजंच विश्वकर्णशकस्मृतः ॥
कलशस्तस्य सौवर्णो मुखमीशानमिरितं ॥ २४ ॥ तस्य
कंथापीतवर्णा लक्षणंस्कंद गोत्रीणां ॥ एतेषांपंचगोत्रा-

णि भिन्न भिन्नानि नसंशय : ॥ २५ ॥ एकैकस्यच गो
त्रस्य शाखासूत्रादिकं प्रथक् ॥ यस्यगोत्रस्य याशाखा
यत्सूत्रं प्रवरादिकं ॥ २६ ॥

॥ टिका ॥ माझे ईशानमुखांपासून ॥ तोविश्वकर्ण आचार्यजाण ॥ आवतार गुरुसमर्थ पूर्ण ॥ दंडशिक्षा करावया ॥ ४९ ॥ तयाचे सूत्रपंच वर्ण ॥ विरशैवप्रवरोप्तन्न ॥ सर्वाचाधिगुरुत्व संपूर्ण ॥ असेजाण विश्वार्या ॥ ५० ॥ मंत्रबीज जयाचानेम ॥ हतींबिल्वदंडसुगम ॥ कलशाधातुअसेहेम ॥ वस्त्रजाण पीतची ॥ ५१ ॥ शाखाज्याची विश्वकर्ण ॥ कमंडलुचाही वर्ण ॥ स्कंदगोत्र अग्रगण ॥ श्रेष्ठासन जयाचे ॥ ५२ ॥ ईश्वरह्मणें पार्वतिप्रति ॥ हेआच्यार्य अवतारमागुती ॥ सूत्रेंप्रगटली अद्भूतरिति ॥ वेगळाली वीरशैवा ॥ ५३ ॥ ऐसेहें पंचाच्यायाचीं स्थानें ॥ तुजनिरोपिलीं वरानने ॥ माहेश्वर जंगमाचें मूळस्थान ॥ वीरशैवाचे मुख्यगुरु ॥ ५४ चहुयुगीं आच्यार्य झाले ॥ वीरशैवधर्मा प्रतिपाळीले ॥ सातशेंसत्तरगण निवडीले ॥ धर्मरक्षणा कारणें ॥ ५५ ॥ गणअनंत असती ॥

शिवगणाची महाशक्ति ॥ रुद्रगणअमर असती ॥ वर्णावया शक्ति-
नोहे ॥ ५६ ॥ एकाचौकडिचे गण ॥ जरीगणती गणलेजाण ॥
परीअनंत चौकड्याचीखूण ॥ सांगतो ऐकापा ॥ ५७ ॥ कृतत्रेत
आणिद्वापार ॥ कलीयुगा सहितचार ॥ ही एकचौकडी साचार ॥
होतसे गणावया ॥ ५८ ॥ ऐशाचौकड्या एकसहस्त्र होती ॥ तव
अस्तमाना जायगभस्ती ॥ तैशासहस्त्र चौकड्याजाती ॥ तवएकदिव-
स ब्रह्मयासी ॥ ५९ ॥ ऐसेतीसदिवस जाती ॥ तवएकमास होय
विधात्याप्रती ॥ ऐसेद्वादश मासहोतीं ॥ तयींएकवर्ष होय ॥ ६० ॥
ऐशींवर्षेंजाती एकशत ॥ तवब्रह्मयासी होयअंत ॥ त्याचेअयुष्याचे
सरेंगणित ॥ तेव्हांएकघटिका विष्णुचीं ॥ ६१ ॥ ऐशाघटिका सा-
ठजाती ॥ तवएकदिनहोय विष्णुप्रती ॥ ऐसेतीस दिवसहोतीं ॥
तयींमासएक विष्णुचा ॥ ६२ ॥ ऐसेमास द्वादशहोती ॥ तयींएक
वर्ष विष्णुप्रती ॥ ऐशीवर्षशत जाती ॥ तेव्हांविष्णु एकहोय ॥ ६३
ऐसेविष्णु द्वादशहोतीं ॥ तयींअर्धपल रुद्राप्रति ॥ त्यारुद्राचे गण
सांगुकिती ॥ केवि गणवेलपै ॥ ६४ ॥ ऐसेयुगा युगीचेगण ॥

सांगेऐसाआहे कोण ॥ ह्मणूनिसंक्षपें मात्रेंप्रमाण ॥ सातशेंसत्तर
असती ॥ ६५ ॥ यावेगळे सप्तकोटी ॥ तेअसती कैलासकपाटी ॥
तयाचीनामें सांगतानिकटी ॥ धनिनपूरे वर्णावया ॥ ६६ ॥ ऐसी
शिवाचार दीक्षाजाण ॥ पंचाचार्य युगायुगी निर्माण ॥ शिवाचारा
प्रतिस्थापून ॥ भक्तिजना लाविती ॥ ६७ ॥ इति श्री परमरहस्य
सारअमृत ॥ टीका करूनिप्राकृत ॥ कृतकृत मन्मत ॥ षोडशोध्यायः ॥
संपूर्ण मस्तु ॥ ६८ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ छ ॥ छ



॥ श्रीगुरु परब्रह्मणे नमः ॥ श्रीपरमरहस्य ग्रंथसुंदर ॥ षोडशो-ध्याय पर्यंतसार ॥ वीरशैव धर्माचे प्रकार ॥ वर्णिलेशे बहुविध ॥ १
आतांसुरस पवित्राविधि ॥ जाग्रत लिंगमंत्रसिद्धि ॥ दीक्षासंस्कार विवाहआधि ॥ योग्यजाण वीरशैवा ॥ २ ॥ तयासंस्काराची संधी ॥ कोण्यकालीं सांगाआदी ॥ लिंगधारी पूजाविधि ॥ जेणेंसफस होतसे ३

॥ श्लोक ॥ ईश्वरोवाच ॥

गर्भाष्टमे कृतामुख्या दीक्षासा षोडशाविधि ॥
गौण तदुर्ध्वे मधमा दीक्षावीरान्ववायिनां ॥ १ ॥

टीका ॥ ईश्वरम्हणेआंबे प्रती ॥ तुझ्याप्रश्नें जगोध्दरती ॥ तेचीमी आनंदप्रित्ती ॥ श्रुतकेलेअसेपै ॥ ४ ॥ जन्मझाल्या पासूनजाण ॥ लिंगदेह्याची आठवण ॥ तीचदृढ सुपरिपूर्ण ॥ येणेंसंस्कारहोंतअसे ॥ ५ ॥ जन्मापासून आठवेवर्षी ॥ दीक्षाकाल उत्तमअसे ॥ मध्यमजाण षोडशवर्षे ॥ तयापुढे गौणपै ॥ ६ ॥ दीक्षेलागीआचार्य आवाहान ॥ आदिकरावें न्यासध्यान ॥ संकल्पें प्रोक्षूणी पूजाविधान ॥ आच्यार्याआसन द्यावेंपै ॥ ७ ॥ साक्षात

मूर्तिमंतगुरु ॥ तयाकरूनि अतिआदरु ॥ शरणशिष्याचा अंगीका
रु ॥ दीक्षेलागी प्रार्थावें ॥ ८ ॥ देशीकआसनी नसता ॥ आरंभू
नयेकार्य सर्वथा ॥ नमस्कारून तत्वता ॥ रुद्राक्षाभरण भस्मशो
भे ॥ ९ ॥ आच्यार्यकलश जलेंकरून ॥ प्रणवबीजांकित पूर्ण ॥
पंचपल्लवतळी धान्यें ॥ शास्त्रविधिवीरशैवे ॥ १० ॥ दिक्षापरित्वें
कलशचार ॥ पूर्वपश्चिम आणिउत्तर ॥ दक्षिणचवथी सत्वर ॥
स्थानें जाणदेवींपै ॥ ११ ॥ मध्यकलश पांचवापूर्ण ॥ प्रणवरूपीं
गुरुजाण ॥ कार्यायोजी मुख्यासन ॥ यथाविधि तयाप्रती ॥ १२
मगकरावें पूजन ॥ षोडशोपचारे जाण ॥ जेणेंगुरु सुप्रसंन्न ॥
होतसे मोक्षदेता ॥ १३ ॥ तयीगुरु प्रेमेंकरून ॥ भस्मधारणेक
री पावन ॥ निद्रस्थालिंगा चैतन्य ॥ प्राप्तकरीतयेवेळां ॥ १४
प्रतिष्ठाप्राण संजीवनी ॥ चरदीक्षा लिंगालागूनी ॥ स्वकरें शिष्य
हस्ते देवूनी ॥ मस्तकीं हस्तठेवी ॥ १५ ॥ तयींझाला गुरुकर
जात ॥ गुरुपुत्राचे मालिकेंत ॥ प्रसिध्द योगइंद्रियजीत ॥ महामंत्र
ग्रहणकरी ॥ १६ ॥ तयाचेंपुण्य पुरश्चरण ॥ संख्याचारलक्ष जा

ण ॥ तितकेची जंगमभोजन ॥ सिध्दिस्तव आचरावे ॥ १७ ॥
गुरूमंत्र ऐकूनकर्णी ॥ सद्गदपावे जाचीवाणी ॥ स्वधर्मी निष्ठापू
र्वेजदोन्ही ॥ उद्धरतीनि: संशय ॥ १८ ॥ जयापंचकलशी दी
क्षानाहीं ॥ तयाभवी बोलतीपाही ॥ तोशिवभक्ताचि नोव्हेदहीं ॥
अन्यदेहीं जाणावा ॥ १९ ॥ तीर्थप्रसाद तत्वता ॥ देवूनयची
सर्वथा ॥ लिंगांगीं दीक्षानसता ॥ भवीतया बोलीजे ॥ २० ॥
जयातीर्थ प्रसादनाहीं ॥ तोंवरीवरी भाक्तदावीकांहीं ॥ कंठीचाइष्ठ
लिंगतोही ॥ पाषाणवत् जाणीजे ॥ २१ ॥ तीर्थलिंगाचें असेंजीवन
॥ तयावीणें लिंगनिर्जीवजाण ॥ नमीळें प्रसादपत्रींपूजन ॥ तो
निर्जीवलिंग जाणीजे ॥ २२ ॥ कोणीह्मणतीजे लिंगबाधीलें ॥
तयींचतीर्थप्रसाद आर्पिलें ॥ आतांप्रतिदिनीं कायघेतले ॥ क्रिया
चालवा वया ॥ २३ ॥ तरीतैसेनाहीं देख ॥ जेयींवृक्ष लाविले
अनेक ॥ तयेवेळींच तयाउदक ॥ घातलेवारंवार कासया ॥ २४
नित्यमंत्रोदक लिंगावाहून ॥ पवित्रपणें करावेंशेवन ॥ गुरुपादोद
कमंत्रा समान ॥ जाणूनिया प्राशावें ॥ २५ ॥

श्लोक ॥ पत्रंपुष्पंफलंताय मन्नपानाद्य मौषधं ॥ लिं
गार्पितंविनाभुंक्ते भुंक्तेसद्योहिकिल्बिशं ॥ २ ॥

टीका ॥ लिंगधारी इष्टधर्मपहाता ॥ फलपत्रातें ग्रहणकरितां ॥ पुष्प अन्नआणि औषधलत्ता ॥ लिंगार्पित करावी ॥ २६ ॥ लिंगार्पिताविणें वस्तु ॥ कधींकरूनये ग्रस्तु ॥ नस्पर्शे भस्म मंत्रातू ॥ पातकघडे तयाप्रती ॥ २७ ॥ ऐसाहा प्रसिद्धधर्म ॥ लिंगधारी जाणतांवर्म ॥ आचाराचा करिप्रेम ॥ तेचीज्ञानी जाणावें ॥ २८ ॥ दीक्षागुरु सांगेआचारवर्म ॥ तेचीआचरावे स्वधर्म ॥ इतरगुरु बोधितीकर्म ॥ तेवीरशैवा नसेपैं ॥ २९ ॥ थरेगुरुघरोघरीं आसती ॥ स्वार्थअर्थ बोधिशिष्याप्रति ॥ तयाचेसार्थक नजाणती ॥ नर्किंघालीती कुमार्गें ॥ ३० ॥ नानामत्तांतर दाविती ॥ तीर्थाटणा पाठविती ॥ कोणपाषण पूजविती ॥ नानारुपीं देवते ॥ ३१ ॥ एकतपाशी पाठविती ॥ एकधूम्रपान करविती ॥ एकपंचाग्नि साधविती ॥ संसारसुखा त्यागूनी ॥ ३२ ॥ कोणीलोकिककर्म दाखविती ॥ कोणवायू अहारघेवविती ॥ कोणीआसनि बैसविती

एकहोती मौनधारी ॥ ३३ ॥ एकनग्नची ते पळती ॥ एकस्त्रीयाते
टाकविती ॥ एकइच्छाअन्न त्यागीती ॥ कष्टेंभक्षीती कंदमूळें ॥
३४ ॥ एकतेकपाटी बैसती ॥ एकबोडकेची आसती ॥ एकउर्ध्वे
बाहू उभारिती ॥ मस्तकीं जटावाढवून ॥ ३५ ॥ एकतेअजपें
गोविती ॥ एकतेसमाधि लाविती ॥ एकतेतिमिरा प्रतिभासती ॥
आखंडडुल्लती जाणपैं ॥ ३६ ॥ एकनाशिकीं लक्षलावविती ॥ ए
कनेत्र विकाशीत ठेविती ॥ एकनयनाप्रती झाकविती ॥ अंतरीं पहा
ह्मणूनी ॥ ३७ ॥ एकदेवतांतरे भेटविती ॥ एकहठयोग जाणविती ॥
जलासनीं बैसविती ॥ दुःखदायक साधनीं ॥ ३८ ॥ एकऐसा उ
पदेशकरती ॥ आत्मज्ञानातें वर्णिती ॥ चैतन्य साधनइच्छिती ॥ दुः
खपावती नसाधता ॥ ३९ ॥ ऐशीनानासाधनें साधावितां ॥ गु
रुवचनीं विश्वासनसतां ॥ सर्वसाधनें निर्फळतत्वता ॥ होतीजाण
अनयासे ॥ ४० ॥ ह्मणूनसद्गुरुसीजावें शरण ॥ स्वधर्मनीतीचें वि
वरण ॥ करूनअसावें आचारपूर्ण ॥ तरीचसर्व साध्यहोते ॥ ४१ ॥
जेंजेंकरावें आचरण ॥ तेंतेंशिवार्पित करूण ॥ लिंगनिष्टें गुरुशव

न ॥ करूनवर्ते जगींधन्य ॥ ४२ ॥ तोसकल क्रियेशीकर्ता ॥ निष्काम बुध्दिरहिता ॥ अष्टमासिद्दि पायालागता ॥ श्लाघ्यता न इच्छी ॥ ४३ ॥ तयात्रिभुवनीचें राज्यदेता ॥ थुंकूनटाकीं सर्वथा ॥ इंद्रपदाप्रती ह्याणीलाथा ॥ निमग्नराहे ब्रह्मरूपीं ॥ ४४ ॥ जोअमृत पानकरीतअसे ॥ तोकांजी अपेक्षानधरीतसे ॥ जोविवेक सुख भोगीतसे ॥ तोनिमग्न बह्मरूपीं ॥ ४५ ॥ जोपरब्रह्म मूर्तिशुद्ध जंगम ॥ तयावर्णिती वेदागम ॥ परात्पर सुखाचेंधाम ॥ तयादर्शनें प्राप्तहोय ॥ ४६ ॥ जेथेंमुक्तिदाश्य करीनिरंतर ॥ प्रसन्नझाल्या भक्तादेसत्वर ॥ आपलेपद अधिकार ॥ न पाहे मागेपुढें ॥ ४७ ॥ तोभावाचा भोक्ता ॥ सद्भावें शरणजाता ॥ जन्मजन्मांतरींची व्यथा ॥ सर्वही हरतसे ॥ ४८ ॥ तोचीकृपेचा असेसागर ॥ त्याचीकृपा अह्मा निरंतर ॥ शिवत्वाची पदवीथोर ॥ प्राप्तहोय तयायोगें ॥ ४९ ॥ शिवह्मणे गिरजेप्रती ॥ माझेअंश जंगममूर्ति ॥ देवादिक सदावंदिती ॥ रूपमाझें ह्मणूनिया ॥ ५० ॥ शिवपार्वती संवाद ॥ वीरशैव आचारभेद ॥ वर्णिलाअसे नानाविध ॥ त्याचेंसार कथीलेसें ॥ ५१ ॥

ऐसेपार्वती ऐकूनवचन ॥ तद्रूपझाली आनंदघन ॥ तन्मयहोऊन-
निया उन्मन ॥ तटस्थझाली जगदंबा ॥ ५२ ॥ सावधहोऊन पार्व-
ती ॥ नमस्कारकरी शिवाप्रती ॥ ह्मणेमजकळली वीरभक्ती ॥ आचारनी
ति सुक्ष्मजी ॥ ५३ ॥ महापुरीं वाहातजाता ॥ अकस्मात्त भेटेजीवदाता ॥
तैसेमज स्वामी समर्था ॥ भ्रमातून काढीले ॥ ५४ ॥ चरणालागे वेळोवे-
ळां ॥ अज्ञानजनाचेये डोळां ॥ धन्यधन्य ज्याश्वनिळा ॥ सुनीति दाख-
विली ॥ ५५ ॥ जेअसती वीरभक्त ॥ जेआचार दीक्षावंत ॥ जे
झाले गुरुकरजात ॥ तेहीग्रंथ परिसावा ॥ ५६ ॥ भविसीश्रवण
नकरवावा ॥ वीरशैवासदा ऐकवावा ॥ ऐकूनहृदयीं धरावा ॥ तैसा-
ची करावा आचारु ॥ ५७ ॥ असोआतां कथनफार ॥ परमरहस्य
ग्रंथसविस्तर ॥ पार्वतीप्रती ईश्वर ॥ सांगतसे वारंवार ॥ ५८ ॥
त्याचेसार ह्याग्रंथाचेठायीं ॥ वर्णिलेंअसे सत्राध्यायीं ॥ अज्ञजना आ-
चाराविषयीं ॥ आरसाजाण पहावया ॥ ५९ ॥ हाग्रंथस्वयें ईश्वर
मुखीचा ॥ तोचीआवतार नागेशसाचा ॥ वीरशैवधर्म पाळावयाचा ॥
प्रगट करविणारपै ॥ ६० ॥ तयाचें नामाभिधान ॥ नागेशगुरु

ह्मणऊन ॥ प्रगटकेलें गुह्यज्ञान ॥ लिंगधारी कळावया ॥ ६१ ॥
४ यालागी शिवतोचीहा नागेश्वरु ॥ परंपरेंची बश्वराजश्रीगुरु ॥ मा-
नूरपट सिंव्हासनाधिकारु ॥ असेजाण जयाशी ॥ ६२ ॥ तयाचें
कृपें करूनियाजाण ॥ परमरहस्य टीका विस्तारून ॥ बश्वराजकरवी
त आपण ॥ मतिहिना कडूनपै ॥ ६३ ॥ हाअसेप्रसादी ग्रंथजाण ॥
याचेकरीजो नित्यपारायण ॥ तयाचीभवव्याधी चुकेंमरण ॥ अमर
होय सत्यपै ॥ ६४ ॥ ज्याचानाहीं लिंगींविश्वास ॥ जेअन्यधर्मांचे
बनलेदास ॥ त्याचास्पर्शनकरावा याग्रंथास ॥ अधर्मिंजाण ह्मणूनि-
या ॥ ६५ ॥ जेविश्वासें भावेंवाचिती ॥ तेसंसारसुख भोगिती ॥
अंतीपावें सायुज्यमुक्ती ॥ धन्यनर तेचीपै ॥ ६६ ॥ जयाचेजैसे ये
संकट ॥ तेंतेंवारी नीलकंट ॥ ग्रंथींविश्वास एकनिष्ठ ॥ तरीचफल ४
होयतया ॥ ६७ ॥ जेदुर्जन निंदकखळ ॥ तयानावडे ग्रंथरसाळ ॥
रंभाफलत्यागून अर्किफळ ॥ आवडीजाण वेंचीतसे ॥ ६८ ॥ कीं
दुग्ध सांडूनियाजाण ॥ प्राशीमद्याते जाऊन ॥ किंदुर्दैवें नेत्रबांधून ॥
द्रव्यघटा ओलांडी ॥ ६९ ॥ तैसेपरी होययेथें ॥ जन्मून वीरशैवे

धर्मातें ॥ इतरधर्मी आचारेंवर्ते ॥ आधोगती प्राप्ततया ॥ ७० ॥
विश्वासेंजे श्रवणकरिती ॥ तयाची सर्वव्यथाहरती ॥ पठणकरितां
धनाढ्यहोती ॥ कीर्तिभोगिती अपार ॥ ७१ ॥ पुत्रइच्छा धरून
मनीं ॥ तत्परहोती पारायणीं ॥ तयाचाविस्तार ततक्षणी ॥ होय
जाण शिवकृपें ॥ ७२ ॥ हापरमरहस्य ग्रंथभांडार ॥ वीरशैवधर्माचे
बीजांकूर ॥ भावेंकरितां रक्षणसत्वर ॥ भवबाधा नोव्हेतया ॥ ७३
श्रोतेशिवगण समस्त ॥ तयाविनवी किंकरमन्मथ ॥ ग्रंथसमाप्तीस
अज्ञाघेत ॥ सद्गदचित्तीं होऊनिया ॥ ७४ ॥ कपिलाधार भूकैला-
शी ॥ आरण्यस्थान रम्यमानशी ॥ ग्रंथसंपविला अविनाशी ॥ ज-
न्मसार्थक हेचीपै ॥ ७५ ॥ शेक ॥ १५२२ ॥ पंधराशें बावीस ॥
विक्रम नामसवत्सरास ॥ शुद्धत्रयोदशी माघमास ॥ ग्रंथपूर्ण
झालासें ॥ ७६ ॥ इतिश्री परमरहस्य सारामृत ॥ टीकाकरूनी
प्राकृत ॥ कृतकृत मन्मत ॥ सप्तदशमो ध्याय संपुर्णमस्तु ॥ ७७

॥ आश्रय दात्यांचीं नावें ॥ ॥ प्रति ॥

याग्रंथाचे प्रसिद्धिकरितां ॥ जेजेसाह्यझाले तत्वता ॥
त्यांचींनामें खालींपहाता ॥ मनन होती सत्वर ॥ ७८ ॥

| | |
|---|---|
| ॥ श्रीमद्द गुरुमूर्ति गंगाधरस्वामी पटाधिकारी चरमूर्ति औंधकर ॥ | १ |
| ॥ श्रीगुरुमूर्ति रामलिंगस्वामी पटाधिकारी चरमूर्ति करमाळेकर ॥ | १ |
| ॥ श्रीगुरुमूर्ति निर्वाण रुद्रपशुपतीस्वामी पटाधिकारी चरमूर्ति बार्शीकर ॥ | २ |
| ॥ श्रीगुरुमूर्ति गुरुसिद्धस्वामी पटाधिकारी चरमूर्ति दहिवडीकर ॥ | १ |
| ॥ माहेश्वरमूर्ति गुरुपद गंगाधरअय्या हिरेमट कोल्हापूरकर ॥ | १ |
| ॥ माहे० बसलिंगअय्या कुसनूरकर ॥ | १ |
| ॥ माहे० विश्वनाथ शंभुअय्या पाबळकर ॥ | १ |
| ॥ माहे० बाबाजी अय्या सिधय्या मटपती सारूळेकर ॥ | १ |
| ॥ माहे० महादूअय्या मटपती आरणगावकर ॥ | १ |
| ॥ गुरुभक्त रामलिंगशंकर तोडकरी मोहळकर ॥ | १ |
| ॥ ,, प्रसादअपा महादापा देवणे बार्शीकर ॥ | १ |

 

| | | |
|---|---|---|
| ॥ ,, | गणपती शेटमहाजन बार्शीकर ॥ | १ |
| ॥ ,, | नागापाअपा मिटकरी रीसवडकर ॥ | १ |
| ॥ ,, | रघुबचलिंग सोमेश्वरकर ॥ | १ |
| ॥ ,, | गोविंद पुंजापा मिटकरी जाणेफळ ॥ | १ |
| ॥ ,, | महादेव शेटीबा निलाखे बा० कर ॥ | १ |
| ॥ ,, | विरापा गणापा सोसे खामगावकर ॥ | १ |
| ॥ ,, | दुड्डापाअपा दड्डी गडइंग्लज ॥ | २ |
| ॥ ,, | संगण बसापा मंगसूळी आथणी ॥ | २ |
| ॥ ,, | तुकाराम वाघशेट औंदे देवरअष्टें ॥ | १ |
| ॥ ,, | गणपति अपा सबरजिष्टर कारकून बाळापूर ॥ | १ |
| ॥ ,, | काशिनाथ अपा जिरवणकर रिसवड ॥ | १ |
| ॥ ,, | बाळकृष्ण बाबाहळकर पुणें ॥ | १ |
| ॥ ,, | संगापा नागापा खाणापूरे मुंबई ॥ | १ |
| ॥ ,, | रेवापा रुद्रापा महाजन आथणी ॥ | १ |
| ॥ ,, | सातलिंग अपा निलंगे सोलापूर ॥ | १ |

॥ ,, मारुती रामशेट ढोले बार्शीकर ॥ १
॥ ,, संगापाहोसूर रहाणा अथणी ॥ १
॥ ,, श्रीमंत विठ्ठलराव पतंगरावदेशमुख चिकुर्डे ॥ १
॥ ,, रुद्रापा विरापा अवरादी तेरदळकर ॥ १
॥ ,, चनबसअपा विरुपाक्षअपा दुगाणी ॥ २
॥ ,, अण्णाअप्पा कलेढोणकर ॥ १
॥ ,, बाळाबापू अप्पाइंगुलीकर खामगांव ॥ १

हेंपुस्तक बार्शी येथें प्रबोधरत्न छापखान्यांत लिंगाईत लोकांचे उपयोगा करितां पारलिंगप्रभूअप्पा वीरशैवाचार वाणीविलास विद्यालयाचे शिक्षक व प्रबोधरत्नाचे मालक यानीं याग्रंथाच्या १०प्रति जमवून त्यांतून शुद्ध व आचारास योग्यअशाचा शोधरून पुष्कळश्रमानें हा ग्रंथशेवटास नेला. खर्चाच्या वगैरे आडचणी मागेसारुन. लिंगाईता करितां सुमार्गदर्शी हा पाहिलाच ग्रंथआहे. यापुढेंचांगला आश्रय मिळाल्यास पुढेंचांगली उमेदयेऊन दुसरें धर्मसंबंधीं ग्रंथांची योजनाहोईल. करितां याकामीं सर्वांचेंलक्षअसावें मितीमाघ शुद्ध १३ शके १८०९